हें परम रहस्य आमच्या देशबांधवांना कळवून तद्द्वारा आमच्या जुन्या ज्योतिःशास्त्राचा जीर्णोद्धार करावा अशी आमची उत्कटेच्छा आहे. पण वस्तुस्थिति संन्याशाच्या लग्नाप्रमाणें प्रतिकूल आहे. ह्मणून पूर्वांगविषयक हें पुस्तक प्रथम लिहिणें जरूर पडलें. उत्तरांगावर ग्रंथ लिहिण्यास अनेक विद्वानांची व द्रव्याची मदत लागते. वर्तमान स्थितीवरून विचार करतां हें काम दुर्घट दिसतें; तथापि हा विषय आमच्या वाचकांच्या नुसता कानावरून गेला तरी कधीं काळीं त्याच्या अभ्युदयार्थ परमेश्वर कोणाला तरी प्रेरणा करील, अशा समजुतीनें या विषयाचें केवळ दिग्दर्शन मात्र आम्ही खालीं करीत आहों.

या विषयास इंग्रजींत Physical Astronomy, Theoretical Astronomy, Celestial Mechanics अशीं नांवें आहेत. आम्हीं यास ' **दिव्यशिल्प** ' हें नांव योजिलें आहे. दिव्यशिल्पाचे दोन विभाग आहेतः—

१ ला. गोलद्वयप्रश्न Problem of Two Bodies.
२ रा. गोलत्रयप्रश्न Problem of Three Bodies.

प्रथम सूर्य आणि ग्रह असे दोनच गोल आहेत असें कल्पून कोणा एक्या विवक्षित क्षणीं त्या दोन गोलांमधील सरळरेषारूप अंतर ( Distance ), त्यांचें प्रकृत्यंश ( Mass ), ग्रहाचा वेग ( Velocity ), आणि गमनदिशा ( Direction ) या गोष्टी समजल्या तर येवढ्यावरून ग्रहाचें मध्यमांतर ( Mean Distance ), नीच ( Perihelion ), केंद्रच्युति ( Excentricity ), आणि प्रदक्षिणाकाल ( Periodic Time ), हीं चार मानें ( मूलांक, Elements. ) गणितानें कशीं आणावीं, हा प्रकार गोलद्वयप्रश्नांत सांगितला असतो.

पूर्वीं सूर्य आणि ग्रह असे दोनच गोल होते. पण आतां एक नवीनच ग्रह आणून त्याला सूर्याभोंवतीं फिरावयाला लाविलें तर त्यापासून पहिल्या ग्रहाच्या पूर्वोक्त मूलांकावर काय परिणाम होतो या गोष्टीचा विचार गोलत्रयप्रश्नांत केला असतो. नवीन ग्रह येण्याच्या पूर्वीं पहिल्या ग्रहाचे मूलांक स्थिर होते. म्हणजे कालत्रयीं त्यामध्यें फेर पडला नसता. पण आतां या नवीन ग्रहाच्या उपस्थितीमुळें पहिल्या ग्रहाचे सर्व मूलांक चल होतात. तिघांच्या सापेक्ष स्थित्यनुसार या गोलत्रयांतून जाणाऱ्या पातळीमध्यें सूर्य आणि पहिला ग्रह कमीजास्त ओढले जातात. या ओढाताणीस आम्हीं **परिपीडन** ( Perturbation ) हें नांव योजिलें आहे. गणिताच्या सोयीसाठीं या परिपीडनाचे तीन प्रकार केले जातात.

१ ला प्रकार. **महाकालिक** ( Secular Perturbation ). याचें उदाहरण चंद्र ग्रह इत्यादिकांचें कालांतरसंस्कार. हे कलाच्या वर्गघनानुसार बदलतात, याच्या एका पर्यायास लाखों वर्षें लागतात.

२ रा प्रकार. **दीर्घकालिक** ( Long Period Perturbation ) याचें उदाहरण गुरु आणि शनि यांचे मोठे संस्कार.

३ रा प्रकार. **अल्पकालिक** ( Short Period or Periodic Perturbations ) याचें उदाहरण गुरु आणि शनि यांचे लघु संस्कार. चंद्राचे तिथिच्युत्यादि संस्कार. दिव्यशिल्पशास्त्र जितकें आनंददायक आहे तितकेंच तें बिकटही पण आहे. याच्या अध्ययनास पुढें सांगितलेल्या विषयांचें मार्मिकज्ञान लागतें.

उच्चबीजगणित. Higher Algebra.

समीकरणोपपत्ति. Theory of Equations.

बैजिक भूमिति. Analytical Geometry.

परमाणुगणित. Differential Calculus.

पिंडगणित. Integral Calculus.

परमाणुसमीकरणें. Differential Equations.

गणिताच्या बहुधा प्रत्येक शाखेवर **टॉड्हंटर** या गणिताचार्यांचीं पुस्तकें आहेत. तीं एकाच्या हातचीं असल्यामुळें चांगलीं सुसंगत आहेत. इतर विद्वानांनीं निरनिराळ्या गणितशाखांवर लिहिलेले शेंकडों उत्तम ग्रंथ इंग्लिश आणि फ्रेंच भाषेंत आहेत. प्रत्येक ग्रंथ आपापल्या परीनें चांगलाच असतो. एका पुस्तकांत एका विषयाचें विवेचन उत्तम असेल तर दुसऱ्या पुस्तकांत दुसराच विषय तितकाच उत्तम प्रतिपादिलेला असतो. म्हणून केवळ पुस्तकावरूनच ज्यांना या शास्त्राचें अध्ययन करणें असेल त्यांनीं एकाच शाखेसंबंधानें लिहिलेलीं अनेक विद्वानांचीं पुस्तकें वाचणें बरें.

पण विद्यार्थिवर्गाच्या तर्फेनें असेंही म्हणतां येईल कीं, पूर्वोक्त ग्रंथांत प्रत्येक बाबीचा विस्तार फारच केलेला असतो, त्यापैकीं ज्योतिःशास्त्रास जरूर लागणाऱ्या गोष्टी कोणत्या हें न समजल्यामुळें नवीन विद्यार्थी निराश होण्याचा संभव फार. अत्यंत चिकाटीचे विद्यार्थी क्वचित् असतात. म्हणून प्रत्येक शाखेचीं मूलतत्त्वें उत्तम रीतीनें थोडक्यांत समजावून देणारी व त्या त्या तत्त्वांचा दिव्यशिल्पास कोठें व कसा उपयोग होतो, तें जेथल्या तेथें सांगून देणारी अशी एक मराठी किंवा इंग्रजी भाषेंत ज्योतिर्गणित-पुस्तकावलि तयार करणें अत्यावश्यक गोष्ट आहे.

ज्योतिःशास्त्राच्या सांगोपांग अध्ययनास उपयोगीं अशी इंग्लिश व फ्रेंच भाषेंत लिहिलेल्या पुस्तकांची यादी वाचकांच्या माहितीसाठीं येथें देऊन ही उपपत्तिमीमांसा संपवितों.

1 Outlines of Astronomy – by Sir John Herschel.
2 Astronomy – by Sir Norman Lockyer.
3 Gravitation – by Sir George B. Airy.
4 Higer Algebra – by Hall and Knight.
5 Course of Mathematics – by P. T. Main.
6 Trigonometry – by I. Todhunter and J. Hymers.
7 Conics – by W. H. Drew.
8 Co-ordinate Geometry – by Todhunter.
9 Infinitesimal Calculus i. e. Principles of the Differential and Inetgral Calculus — by D. A. Murray and E. Edser.
10 Differential Equations — by D. A. Murray, A. R. Forsyth and J. Hymers.
11 Dynamics — by P. G. Tait and W. J. Steele, E. J. Routh and G. B. Airy.
12 Matter and Motion — by Maxwell.
13 Celestial Mechanics — by F. R. Moulton, M. Duhamel, La Place, G. Ponte'coulant, A. Souchon, and F. Tysserand.
14 Lunar Theory — by H. Godfray, J. C. Adams, G. B. Airy, E. W. Brown and H. Poincare.
15 Planetary Theory — by C. H. H. Cheyne, G. B. Airy, Le Verrier.
16 Calculation of Orbits — by F. Tisserand, Watson.
17 Theory of Astronomy — by Rev. R. Main, J. Hymers and Rev. S. Vince.

## मध्यमगणित.

ज्योतिःशास्त्राचें पूर्वांग जें गोलीयज्योतिष ( Spherical Astronomy ) त्याचेंच विवेचन करणें, हा या पुस्तकाचा मुख्य हेतु आहे असें वर आम्हीं कळविलेंच आहे. हें उपपादन चांगलें समजण्यास वाचकांस निदान बीजगणित, भूमिति, त्रिकोणमिति ( सरळ आणि गोलीय ) आणि शंकुच्छिन्न

इतके विषय तरी अवगत असले पाहिजेत. वाचकांची इतकी पूर्व तयारी आहे असें गृहीत धरून या उपपत्तिकथनास आम्हीं प्रारंभ करीत आहों[1].

ज्योतिःशास्त्राचा विषय प्रत्यक्ष म्हणजे डोळ्यांस दिसणारा आहे. म्हणून शक्य तितक्या प्रयत्नानें तो आकृतीच्या द्वारें समजावून सांगणें बरें. पहिल्या भागांत नीच, पात, मंदफल, शीघ्रफल, शर, मंदकर्ण, शीघ्रकर्ण, इत्यादि शब्दांचा उपयोग केला आहे. पण हें सर्व शाब्दिकज्ञान झालें. ज्या पदार्थांचे वाचक हे शब्द आहेत ते पदार्थ प्रत्यक्ष पाहिल्यानें जें ज्ञान होतें तें या कोरड्या शाब्दिकज्ञानापेक्षां शंभरपट पक्कें असतें. म्हणून ग्रहमालारूपी इमारतीचें चित्र वाचकांच्या डोळ्यांपुढें मांडण्याचा प्रयत्न या प्रकरणांत आम्हीं करीत आहों.

१ ल्या भागाच्या उपोद्घातांत विश्व आणि ग्रहमाला यांचा संबंध दाखविला आहेच. येथें ग्रहमालेचा व आमचा संबंध कसा आहे तो दाखवितों. आकृति १ पहा. इचे दोन भाग आहेत. १ ल्या भागांत सूर्य आणि त्याच्या भोंवतीं फिरणारे बुध, शुक्र, पृथ्वी आणि मंगळ या चार ग्रहांच्या कक्षा दाखविल्या आहेत. याच स्केलानें अवशिष्ट ग्रहांच्या कक्षा काढिल्या असत्या तर २० पट रुंद जागा लागली असती म्हणून स्केल २० पट कमी करून दुसरा भाग काढिला आहे. पहिल्या भागांत मंगळाची कक्षा सर्वांत मोठी आहे तीच दुसऱ्या भागांतील कक्षांमध्यें सर्वांत लहान आहे. या दुसऱ्या भागांत मंगळ, गुरु, शनि, वरुण आणि इंद्र या पांच ग्रहकक्षा दाखविल्या आहेत. दोनही आकृतींच्या मध्यभागीं सूर्य आहे. हाले धूमकेतूची कक्षा अत्यंत लांबट दीर्घवर्तुलाकार आहे. तिचें नीचस्थान पहिल्या भागांत बुधकक्षेच्या थोडें बाहेर आहे आणि उच्च २ ऱ्या भागांत इंद्रकक्षेच्याही पलीकडे गेलें आहे.

आपण भरतखंडनिवासिजन दक्षिणेकडे तोंड करून पुस्तक क्षितिजावर उभें धरून वाचीत आहों अशी कल्पना करावी म्हणजे या पहिल्या आकृतीची पातळी आकाशस्थ ग्रहमालेच्या पातळीशीं बरीच समांतर होईल. डावेकडील चित्रा

---

(१) हे विषय हल्लींच्या मराठी शिक्षणक्रमांतून बहुतेक गाळले असल्यामुळें यावरील जुनीं मराठी पुस्तकें दुर्मिळ झालीं आहेत. गत वर्षीं रा० रा० रंगनाथ नारायण मोहाळकर यांनीं सरळ रेषात्रिकोणमितीवर मराठींत एक उत्तम पुस्तक लिहून प्रसिद्ध केलें आहे. सुमारें ६० वर्षांपूर्वीं पुण्याच्या पाठशाळेंतून सरळत्रिकोणमिति ’ नांवाचें पुस्तक छापलें होतें. त्यांत लायतमाचीं आणि प्रत्येक कलेच्या भुजज्या, कोटिज्या, स्पर्शरेषा यांचीं कोष्टकें आहेत. नगरकरांचें बीजगणित, संतितिन्नरकरांचें शंकुच्छिन्न, करकरे यांची भूमिति, समीकरणें, शून्यब्धि आणि मूलपरिणाति नांवाचें एक पुस्तक, हीं सर्व आतां दुर्मिळ झालीं आहेत.

तान्यांतून निघून सूर्याच्या मध्यबिंदूंतून पार जाऊन रेवतीकडे जाणारी एक आडवी रेघ काढलेली आहे. ही रेघ सूर्य आणि रेवती यांच्या दरम्यान प्रत्येक ग्रहकक्षेस ज्या बिंदूंत छेदिते तो बिंदु त्या कक्षेवर भोग म्हणजे कंसाकार अंतर किंवा कोन मोजण्याचें आरंभस्थान आहे असें समजावें. सर्व ग्रह आकृतींत शराग्रानें दाखविलेल्या दिशेनें म्हणजे अपसव्य दिशेनें सूर्याभोंवतीं सर्वकाल फिरत असतात. हालेचा धूमकेतु मात्र सव्य दिशेनें सूर्य प्रदक्षिणा करितो.

सूर्यापासून पृथ्वीपर्यंत जें सरळरेषात्मक अंतर आहे तें सुमारें ९ कोटि मैल आहे. या अवाढव्य अंतराला मानदंड ( Astronomical Unit ) समजून इतर ग्रहांचीं अंतरें याच मानदंडानें मोजून सांगण्याची पाश्चात्य ज्योतिर्वेत्त्याची वहिवाट आहे. म्हणून आकृतींत सूर्यापासून रेवतीकडे जाणाऱ्या रेषेवर सूर्य व ग्रह यांमधील अंतरें याच स्केलाप्रमाणें दाखविलीं आहेत. प्रत्येक ग्रहाला सूर्याभोंवतीं एक प्रदक्षिणा करण्यास लागणारे दिवस त्या त्या कक्षेवर दाखविले आहेत.

८ व्या आकृतींत ग्रहांच्या कक्षा निरुपायास्तव एकाच पातळींत दाखविल्या आहेत. त्या सर्व सूर्याच्या मध्यबिंदूंतून गेल्या आहेत ही गोष्ट खरी आहे. पण प्रति दोन पातळ्यांमध्यें दोन चार अंशांचा कोन आहे असें समजावें. आकृतींच्या पातळीच्या बाहेर दूर राहून त्यांच्याकडे पाहिलें तर त्या कक्षा जशा दिसतात तशा त्या आकृतींत काढिल्या आहेत. पण आपण सूर्याच्या मध्यबिंदूंतून ग्रहकक्षा पाहिल्या तर त्या कशा दिसतील त्याची प्रत्यक्ष प्रतीति येण्यासाठीं थोडी खटपट केली पाहिजे.

सुमारें दोन हात लांब अशी एक ताठ छडी अथवा लोखंडी काडी घेऊन तिजवर आकृतींत दाखविल्याप्रमाणें तारेचीं दोन समकेंद्र ( concentric ) वर्तुलें बांधावीं, अशीं कीं त्यांच्या पातळ्यांमध्यें दोन चार अंशांचा कोन होईल. नंतर त्यांचा मध्यबिंदु आपल्या डोळ्यापाशीं धरून त्या दोन वर्तुलाकडे पहावें. पूर्वीं तीं लहानमोठीं आणि अलग दिसत होतीं; पण आतां तीं समान आकाराचीं, परस्परांस छेदणारीं आणि पलीकडील भिंतीवर अथवा आकाशावर उमटलेलीं अशीं महावृत्तें ( Great Circles ) दिसतील. त्या दोहोंपैकीं एका कक्षेला क्रांतिवृत्त ह्मटलें तर दुसऱ्याला ग्रहकक्षा म्हणतां येईल. सूर्यावरून पाहणाऱ्यास सर्व ग्रहांच्या कक्षा याप्रमाणें आकाशावर उमटलेल्या परस्परांस समोरासमोरील बिंदूंत छेदणाऱ्या आणि महावर्तुलाकार, दिसतात ही गोष्ट पक्की ध्यानांत ठेवावी.

---

( १ ) अस्त्युत्तरस्यां दिशि देवतात्मा हिमालयो नाम नगाधिराजः ।
पूर्वापरौ तोयनिधी वगाह्य स्थितः पृथिव्या इव मानदंडः ॥
— कुमारसंभवम्.

**पातः**–दोन पातळ्यांचा छेद रेषारूप असतो. या रेषेला **संपातरेषा** ह्मणतात. पृथ्वीच्या कक्षेची पातळी सूर्यावरून पाहणाऱ्यास आकाशावर वर्तुळाकार उमटलेली दिसते, असें वर सांगितलेंच आहे. त्या वर्तुळास **क्रांतिवृत्त** ह्मणतात. इतर प्रत्येक ग्रहाच्या कक्षा या क्रांतिवृत्तास समोरासमोर ह्मणजे परस्परांपासून १८० अंश अंतरावर असणाऱ्या दोन बिंदूंत छेदितात. ग्रह आपल्या कक्षेंत फिरत असतांना ज्या बिंदूंतून गेला असतां तो क्रांतिवृत्ताच्या उत्तर बाजूस येतो, त्या बिंदूला **उत्तरसंपात** ( Ascending Node ) किंवा नुसता **पात** म्हणतात. उत्तरसंपाताच्या समोर १८० अंशांवर **दक्षिणसंपात** ( Descending Node) असतो. आकृतींत ग्रहांचे उत्तरसंपातबिंदु त्यांच्या कक्षांवर शराग्रानें दाखविले आहेत.

क्रांतिवृत्त व ग्रहकक्षा यांच्या पातळ्यांमधील कोनाला **विक्षेप** (Inclination) म्हणतात. हा कोन त्या ग्रहाच्या परमशरायेवढा असतो. ग्रहांच्या कक्षावृत्तास आमच्या प्राचीन ग्रंथांत **विक्षेपवृत्त** असें म्हटलें आहे.

ग्रहांच्या अन्योन्याकर्षणामुळें कक्षापातबिंदु अत्यंत मंदगतीनें मागें सरकत जातात. ( कोष्टक ६ पहा. )

**नीचें**:—आकृतींत ग्रहांच्या कक्षा वर्तुलाकार दाखविल्या आहेत. पण वास्तविक त्या तशा नाहींत. छतांतून सूर्यकिरण भिंतीवर किंवा जमिनीवर तिरपें पडलें असतां त्याचा आकार जसा लांबट ( दीर्घवर्तुलाकार ) दिसतो तशा आकाराच्या त्या आहेत. ( आकृति २ पहा. ) ही बुधकक्षा आहे. ही दीर्घवर्तुलाकार आहे. C हा मध्य आहे. H,S. हे दोन फोकस किंवा नाभी आहेत. S या फोकसांत सूर्य आहे. A बिंदु सूर्याला अत्यंत समीप आहे म्हणून त्याला **नीच** (Perihelion) ह्मणतात. B बिंदु अत्यंत दूर आहे म्हणून त्याला **उच्च** ( Aphelion ) म्हणतात. CH, आणि CS हीं अंतरें समान आहेत. CA, CB हीं अंतरेंही समान आहेत. त्यांस **मध्यममंदकर्ण** (Mean Distance) ह्मणतात. CS/CA या अपूर्णांकाला **केंद्रच्युति** ( Excentricity ) म्हणतात. S या सूर्यापासून M, Q, P, इत्यादि परिघावरील कोणत्याही बिंदूपर्यंत जें सरलरेषाकार अंतर त्याला **मंदकर्ण** ( Radius Vector ) म्हणतात.

( आ. १ ली पहा ) ग्रहांचीं नीचस्थानें ˘ या चिन्हानें दाखविलीं आहेत. हीं नीचें ग्रहांच्या परस्पराकर्षणामुळें अत्यंत मंदगतीनें पुढें सरकत असतात. शुक्राचें नीच मात्र पाताप्रमाणें मागें सरकतें. कोष्टक ५ पहा.

( १ ) उच्चस्थितो व्योमचरः सुदूरे नीचास्थितः स्यान्निकटे धरित्र्याः । सि. शि. म.

CS/CA म्हणजे CS÷CA

**ग्रहांचे भोगः**—ग्रहांचीं नीचें व पात जशीं स्थिरप्राय आहेत तसे ग्रह नाहींत. बुध जो सूर्याला समीपतम आहे तो तर दररोज ४ अंश चालतो. म्हणजे सूर्यावरून पहाणाऱ्यास त्याच्या आजच्या आणि उद्यांच्या स्थानांत मध्यममानानें ४ अंशाचा कोन दिसून येतो. (कोष्टक १ लें पहा.) पुढें इंद्रापर्यंत दिनगति उत्तरोत्तर कमी होत गेली आहे. याप्रमाणें सर्वग्रह सूर्याभोंवतीं सार्वकाल फिरत असतात. त्यामुळें प्रतिक्षणीं त्यांचीं स्थानें बदलत जातात. म्हणून उदाहरणार्थ उज्जयिनी येथें शके १८२८ पौष वद्य २ या बुधवारीं मध्यम सूर्योदयानंतर २७ घ० १४ पळें या वेळीं सूर्यावरून पहाणाऱ्यास मध्यमग्रह ज्या ज्या स्थानीं दिसत होते, तीं तीं स्थानें त्या त्या कक्षेवर बिंदू देऊन दाखविलीं आहेत. आणि ग्रहांचीं नांवें केवळ अंकांनीं सुचविलीं आहेत. जसें ३ म्हणजे पृथ्वी, ४ म्हणजे मंगळ असा संकेत केला आहे. ( आकृति १ पहा.)

**मध्यमगतिः**—आकाशांत फेंकलेल्या दगडाची गति जशीं क्षणोक्षणीं बदलत जाते, तद्वत् ग्रहाची गति प्रतिक्षणीं निराळी असते. पण हें बदलणें नियत असतें —म्हणजे ग्रह नीचापासून उच्चाकडे जातांना ती ज्या प्रमाणानें कमी कमी होत जाते त्याच प्रमाणानें ग्रह परत नीचाकडे येत असतांना ती वाढत जाते. नीचोच्चस्थानांच्या मधोमध ग्रह आला म्हणजे त्याची गति आणि मंदकर्ण हीं मध्यम असतात. (आकृ. २ येथें M स्थानीं बुधाची दिनगति मध्यम ४·९२ अंश आणि मंदकर्ण ·३८७१ आहेत. )

अशा क्रमवर्धिष्णुगतीनें चालणाऱ्या ग्रहाचें स्थान निश्चित करण्याच्या कामीं, मध्यमगतीनें चालणाऱ्या कल्पित ग्रहाचा कसा उपयोग होतो, तो प्रकार पुढें रविमध्य गणिताच्या उपपत्तिप्रसंगीं सांगितला जाईल. सध्यां येथें एक दृष्टांत देऊन हें प्रकरण संपवितों. शाळेमध्यें हजर मुलांची संख्या रोजची निराळी असते, म्हणून महिन्याच्या शेवटीं, रोजच्या हजर संख्येची बेरीज करून, तिला शाळा चालू असलेल्या दिनसंख्येनें भागिलें म्हणजे, रोजची सरासरीची हजरी निघते. याप्रमाणेंच ग्रहाच्या रोजच्या असमानगतीची बेरीज केली तर प्रदक्षिणेच्या अखेरदिवशीं तिची एकंदर बेरीज बरोबर ३६० अंश भरते. म्हणून ३६० अंशास प्रदक्षिणेच्या दिवसांनीं भागिलें म्हणजे ग्रहाची रोजची सरासरी गति निघते, तिलाच मध्यमगति म्हणतात.

## वेधावरून मध्यमगति ठरविणें.

मध्यमगति सूक्ष्मपणें ठरविणें जसें महत्वाचें आहे तसेंच तें बिकटही आहे. या कामासाठीं वेध जितके प्राचीन असतील तितके चांगले. पण प्राचीन वेध अर्वाचीन वेधांइतके सूक्ष्म नसतात, म्हणून पुष्कळ प्रसंगीं अर्वाचीन अल्पकालांतरित पण सूक्ष्म अशा वेधांवरून मध्यमगति ठरविणें योग्य दिसतें.

**पिकार्ड** या फ्रेंच ज्योतिष्यानें सूर्य आणि **प्रभ्वा*** ( Procyon ) तारा यांचें अंतर वेधावरून काढिलें. तें तारीख १ एप्रिल १६६९ इसवी रोजीं **पारीसचा** मध्यमकाल ० अ. ३ मि. ४७ सेकंद यावेळीं ९° ५९′ ३६″ आलें.

पुढें दुसरा फ्रेंच ज्योतिषी **लाकेल** यानें इ. स. १७४५ च्या एप्रिल महिन्याच्या २ ऱ्या आणि ३ ऱ्या तारखेस वेध करून सूर्य आणि **प्रभ्वा** तारा यांच्यामध्यें पूर्वोक्त अंतर पडण्याची वेळ आणिली ती पारीस येथें एप्रिल ता. २ री ११ अ. १० मि. ४५ से. आली.

यां दोन वेधांमध्यें २७७५९ दि. ११ अ. ६ मि. ४८ से. इतका काल गेला. व या कालांत प्रभ्वा ताऱ्याभोंवतीं सूर्याच्या बरोबर ७६ प्रदक्षिणा झाल्या. म्हणून या कालाला ७६ नीं भागिलें तर एका **नाक्षत्रसौर**वर्षाचें मान ३६५ दि. ६ अ. ८ मि. ४७ से. येतें. म्हणजे आमच्या हिंदी पद्धतीचें ३६५ दि. १५ घ. २२ प. येतें.

या प्रमाणें अनेक वेध करून येणाऱ्या अनेक नाक्षत्रसौरवर्षांचें मध्यममान ( Average ) काढिलें तर शेवटलीं पळें २२·९ येतात. यावरून आमच्या सूर्यसिद्धांतांतील वर्षमान ३६५ दि. १५ घ. ३१·५ प. हें सुमारें साडेआठ पळें वास्तविक मानापेक्षां अधिक आहे यांत संशय नाहीं.

ग्रीक ज्योतिषी **हिपार्कस** यानें इ० स० पूर्वी १२८ व्या वर्षी वेध करून **चित्रा** ताऱ्याचा सायन भोग १७४° काढिला आणि **मघा** ताऱ्याचा ११९° ५०′ काढिला. आमच्या ज्योतिर्गणिताच्या २३२ व्या पृष्ठावर चित्रेचा सायन भोग २०२° ११′ आहे व मघा ताऱ्याचा १४८° ११′ आहे. हे भोग ता० १ जानेवारी १८८१ या दिवसाचे आहेत. यावरून २००८ वर्षांत चित्रा ताऱ्याचा सायन भोग २८° ११′ वाढला आणि मघा ताऱ्याचा २८° २१′ वाढला असें झालें. या दोन संख्यांचें मध्यममान २८° १६′ ही २००८ वर्षांची अयनगति (Precession of the Equinoxes) झाली. यावरून एका वर्षाची अयनगति ५०″·८ विकला येते. ह्मणून **ग्रहलाघव**कारांची वार्षिक अयनगति ६०″·० विकला ही वास्तविकगतीपेक्षां ८·९ विकलांनीं अधिक आहे, हें सिद्ध.

आमच्या भारतीय ज्योतिर्वेत्त्यांवर पाश्चात्त्यांचा असा दोषारोप आहे कीं, प्राचीन **खाल्डीयन, ग्रीक** लोकांनी जसे आपले वेध जपून ठेविले तसें आमच्या ज्योतिष्यांनीं केलें नाहीं. आमचे ज्योतिषग्रंथ सर्वत्र सिद्ध अंकांनीं भरलेले आहेत. पण ते कोणकोणाच्या व किती वर्षांच्या वेधांवरून सिद्ध केले या गोष्टीचा उल्लेख एकाही ग्रंथांत नाहीं. ही अत्यंत शोचनीय गोष्ट आहे. यामुळें आम्हांवर कृतघ्नतेचा आणि परस्वापहाराचा आरोप करण्यांत येतो. हा दूर करण्यास

*आमचें 'आकाशाचे नकाशे' नांवाचें पुस्तक पहा.

आमच्याजवळ पुरावा नाहीं. ग्रहलाघवकारांचा पिता **केशवदैवज्ञ** हा वेधकर्ता होता. यानें मात्र आपले वेध लिहून ठेविले आहेत. ग्रहलाघवकारांनीं आपण पाहिलेल्या खग्रास सूर्यग्रहणाचा काल पुढील श्लोकांत सांगितला आहे. त्यावरून चांद्रमासाचें मध्यममान ठरविण्यास बरीच मदत होण्याजोगी आहे. तो श्लोक असाः—

शाके त्र्यब्धींद्र १४४३ तुल्ये वृषशरादि मधौ मासि बाणेंदु १५ नाडी
तुल्ये दर्शेऽश्विधिष्ण्ये दिनकर दिवसे भानुसर्वग्रहोऽभूत् ।
तस्मिन्सर्वग्रहेऽस्तंगतमपि सकलं काव्यसप्तर्षिमुख्या-
स्तारा दृष्ट्वांधकाराकालितमिह जगत्तत्तु हाहा चकार ॥

वरील सूर्यग्रहणाची तारीख ७ वी एप्रिल १५२१ इ० येते.

**टालेमी** ( इ० स० १४० ) या इजिप्तदेशच्या ज्योतिर्वेत्त्यानें आपल्या अल्माजेस्त नांवाच्या ग्रंथांत बाबिलोन शहरीं खाल्डीयन लोकांच्या अमदानींत पाहिलेल्या तीन चंद्रग्रहणांचा उल्लेख केला आहे. **हानसेन**प्रभृति अर्वाचीन पाश्चात्य ज्योतिर्वेत्त्यांस चंद्राची मध्यमगति ठरविण्याच्या कामीं त्यांचा विशेष उपयोग झाला. तीं आमच्या वाचकांच्या माहितीसाठीं येथें देणें योग्य दिसतें.

## अतिप्राचीन चंद्रग्रहणें.

१ लें—तारीख १९ मार्च इ० पू० ७२० वर्षे. स्पर्श सायंकाळीं ७ अ. ३० मि. ग्रहणमध्य ९ अ. ३० मि.

२ रें—तारीख ८ मार्च इ० पू० ७१९. ग्रहणमध्यकाल मध्यरात्रीं. ग्रास ३ अंगुलें.

३ रें—तारीख १ सप्तेंबर इ० पू० ७१९. ग्रहणमध्य रात्रीं ८ अ. ३० मि. ग्रास ६ अंगुलें उत्तरेकडे.

पारीसपासून बाबीलोनचें रेखांतर पूर्व २ अ. ४२ मि. आहे. ही माहिती **एस् व्हिन्सच्या** ग्रंथांत दिली आहे.

## कालावधिगणित.

मागील विवेचनावरून ज्योतिःशास्त्रांत कालावधीचें महत्व किती आहे त्याची वाचकांस कल्पना होईल शेंकडों किंवा हजारों वर्षांनीं घडलेल्या दोन गोष्टींमध्यें घटिकापळापर्यंत सूक्ष्मकाल कळल्याशिवाय मध्यमगति ठरविणें किंवा त्यावरून केलेल्या गणिताची प्रतीति पहाणें या दोनही गोष्टी केवळ व्यर्थ आहेत.

सूर्यसिद्धांतादि प्राचीनग्रंथांत कल्पारंभापासून आजपर्यंत लोटलेले दिवस म्हणजे अहर्गण ( Number of Days Elapsed) काढावयाचा असतो. त्यामुळें

त्यामध्यें बारा बारा अंक येतात. पुढें या प्रचंड संख्येवरून मध्यमगति आणितांना गणकाच्या नाकीं नव येतें. हा त्रास चुकविण्यासाठीं ग्रहलाघवकारांनीं ११ वर्षांचें म्हणजे ४०१६ दिवसांचें एक चक्र ( Cycle ) कल्पून इतक्या दिवसांची ध्रुवक नांवाची सूक्ष्ममध्यमगति तयार करून श्लोकरूपानें सांगितली आहे. यामुळें त्यांचा अहर्गण ४०१६ पेक्षां जास्त वाढत नाहीं.

आम्हींही त्यांचेंच अनुकरण केलें आहे; फरक इतकाच कीं, आमचें चक्र १९ वर्षांचें म्हणजे ६९४० दिवसांचेंआहे. आमच्या केतकीग्रहगणितांत आम्हीं याच चक्राचा उपयोग केला आहे. हें चक्र ग्रहलाघवकारांच्या चक्रापेक्षां जास्त सोईचें आहे. या चक्रास पाश्चात्यज्योतिषी (Metonic Cycle) म्हणतात. (प्रख्यात ज्योतिर्वेत्त्यांची त्रोटक माहिती पहा.) या अवधींत चांद्रसौरमानांचा उत्तम मेळ बसतो. आणि अधिकक्षयमासांची पुनरावृत्ति होते. क्षयमासाविषयीं सांगतांना भास्कराचार्य म्हणतातः—

गतोऽब्ध्यद्रिनंदै ९७४ र्मिते शाककाले
तिथीशै १११५ र्भविष्यत्तथांगाक्षसूर्यैः १२५६ ।
गजाद्र्यग्निभूभि १३७८ स्तथा प्रायशोऽयं
कुवेदेंदु १४१ वर्षैः क्वचिद् गोकु १९ भिश्च ॥

सि. शि. म.

दुसरा विशेष असा आहे कीं, या चक्रांच्या पहिल्या १८ वर्षांत ग्रहणाचें चक्र ( Saros ) पूर्ण होतें. म्हणजे चक्राच्या प्रथमवर्षीं जीं ग्रहणें येतात तींच म्हणजे तितक्याच मासाचीं ग्रहणें १९ व्या वर्षीं घडतात. सूर्यचंद्रांच्या मंदफलाच्या अन्यत्वामुळें स्पर्शादि कालांत मात्र फेर पडतो.

## अहर्गण.

एकोणीस वर्षांचें १ चक्र मानिलें असल्यामुळें शके १८०० पासून इष्ट वर्षाच्या आरंभापर्यंत गेलेल्या वर्षसंख्येला १९ नीं भागिलें तर भागाकाराइतकीं गतचक्रें होतात. बाकी राहिलेलीं वर्षें चालू चक्राचीं असतात. म्हणून त्यांस १२ नीं गुणिलें म्हणजे महिने येतात. ते सौरमास असतात. पण आमचा[१] व्यवहार चांद्रमासांवर चालला असतो, म्हणून या सौरमासांचे चांद्रमास केले पाहिजेत.

१९ वर्षांत २२८ सौरमास आणि २३५ चांद्रमास पडतात. म्हणजे ७ चांद्रमास अधिक पडतात. म्हणून ७ चांद्रमास अधिक येण्यास जर २२८ सौरमास लागतात तर १ अधिक मास येण्यास कितीं? या त्रैराशिकानें ३२·६ महिन्यांनीं किंवा

(१) बंगाल, तामिळ, मल्याळ इत्यादि कांहीं देशांत सौरमासाप्रमाणें व्यवहार चालता.

भागाकाराच्या सोयीसाठीं ३३ सौरमासांनीं एक अधिकमास पडतो. यास्तव अधिकमास आणण्यासाठीं सौरमासांस ३३ नीं भागावें असें सांगितलें आहे.

आमच्या गणिताचा प्रारंभ शके १८०० या वर्षी होतो. पण शके १७९९ या वर्षी ज्येष्ठ महिना अधिक पडला होता. म्हणजे अधिक मासाच्या चक्राचा आरंभ १० महिन्यांपूर्वींच झाला होता; म्हणून चालू चक्रांतील अधिकमास आणतांना हे १० सौरमास जमेस धरिले पाहिजेत.

याप्रमाणें अधिकमास आणून ते सौरमासांत मिळविले म्हणजे चांद्रमास होतात. त्यांस ३० नीं गुणून गुणाकारांत चालू महिन्याच्या आरंभापासून गेलेल्या तिथि मिळविल्या तर चालू चक्रारंभापासून एकंदर गततिथि येतात. या तिथींचे दिवस केले पाहिजेत. म्हणून या दोहोंमध्यें काय संबंध असतो तो काढिला पाहिजे

एका सौरवर्षाचा अहर्गण ३६५·२५६३७४४ इ० आहे. यावरून १९ वर्षांचा ६९३९·८७१११ होतो. यांत किंचित् न्यून आहे, तें पूर्ण करून ६९४० पूर्ण दिवस मानण्यास हरकत नाहीं. एकोणीस वर्षांत २३५ चांद्रमास किंवा ७०५० तिथि पडतात असें वर सांगितलें आहे. म्हणून ७०५० तिथि ६९४० दिवसांबरोबर असतात अथवा भागाकाराच्या सोईसाठीं ६४ तिथि ६३ दिवसांबरोबर असतात असें म्हणतां येईल. म्हणून गततिथि आपल्या ६४ व्या हिशानें कमी केल्या म्हणजे अहर्गण होतो असें सांगितलें आहे.

आतां वर्षगणास ६० नीं भागून येणाऱ्या तिथि गततिथींतून वजा कराव्या असें जें सांगितलें आहे त्याचें कारण सांगतों. एका चांद्रमासांत दिवस २९·५३०५८७९ इ० असतात. म्हणून २३५ चांद्रमासांचे दिवस ६९३९·६८८१५६१ झाले. एका चक्राचा अहर्गण ६९४० मानिला असल्यामुळें दर एक चक्रांत दिवस ०·३११८४ जास्त धरिले जातात ते कमी केले पाहिजेत.

दि. ०·३११८४ आपल्या ६३ व्या हिशानें वाढविला म्हणजे तो तिथिरूप ०·३१६७९ होतो. याला ६० नीं गुणिलें म्हणजे घटिका १९·००७४ येतात. यावरून १९ वर्षांत १९ घटिका म्हणजे ६० वर्षांत १ तिथि जास्त धरिली जाते, असें झालें म्हणून जास्त धरलेल्या तिथि कमी करण्यासाठीं वर्षगणास ६० नीं भागून येणाऱ्या तिथि तिथिगणांतून वजा कराव्या असें सांगितलें आहे.

**वारज्ञानः**—चक्राहर्गणांत ६९४० वारांचे ९९१ फेरे होऊन बाकी ३ वार राहतात. गणितारंभीं बुधवार म्हणजे चौथा वार आहे. म्हणून अहर्गणांत चक्राची तिप्पट आणि ४ या संख्या मिळवून बेरिजेस ७ नीं भागून येणाऱ्या बाकीवरून वारनिर्णय करावा असें सांगितलें आहे.

**इंग्रजी तारिखेवरून अहर्गणानयनः—**

या गणिताची उपपत्ति उघड आहे. यांत जे ९२ दिवस ऋण क्षेपक आहेत ते इ० स० १८७८ च्या प्रारंभापासून शके १८०० च्या प्रारंभापर्यंत (ता. ० जानेवारी पासून ता० ३ एप्रिल पर्यंत) गेलेले दिवस आहेत. पुढें जे ३ संस्कार सांगितले आहेत ते **पोप ग्रेगोरी**च्या नव्या पद्धती (New Style) प्रमाणें अधिक दिवसांची गणती करण्यासाठीं आहेत.

**प्रागहर्गणगणितः**–शके १८०० च्या मागील कालांतील अहर्गण आणण्याच्या रीतीची उपपत्ति सहज कळण्यासारखी आहे. सौरमासांत १० बद्दल १८ मिळविण्याचें कारण असें आहे कीं, शके १८०० नंतर १८ महिन्यांनीं म्हणजे शके १८०१ या वर्षी पहिला अधिकमास आश्विन पडला होता. म्हणून मागचें गणित करितांना हे महिने हिशेबांत धरिले पाहिजेत.

**मध्यमभोगानयनः–**

जर $E$ = क्षेपक = शके १८०० च्या प्रारंभीं स्थिति.

$n$ = मध्यम दिनगति.

$t$ = अखंडाहर्गण = शके १८०० च्या प्रारंभापासून इच्छिलेल्या दिवसापर्यंत एकंदर दिवस.

$x$ = इच्छिल्या दिवशीं स्थिति किंवा मध्यमभोग.

तर $x = \mathrm{E} + nt$ हें उघड आहे.

येथें $t$ = अखंडाहर्गण असें मानिलें आहे. पण गणिताच्या सोईसाठीं त्यापैकीं ६९४० दिवस = १ चक्र = $c$. आणि शेष दिवसाबरोबर $d$ असें मानिलें आहे.

म्हणून $t = 6940\ c + d$

$nt = 6940\ nc + nd$

पण $x = \mathrm{E} + nt$

$\therefore \quad = \mathrm{E} + 6940\ nc + nd$

म्हणजे,

मध्यमभोग = क्षेपक + चक्रादिनगति + शेषाहर्गणगति.

## रविमध्यगणित.

**युरोपखंडांत टालेमीपासून कोपर्निकसपर्यंत** (इ. स. १४०–१५४०) चौदाशें वर्षे ज्योतिःशास्त्र निद्रावस्थेंत होतें. आमच्या देशांत जसा सूर्यसिद्धांत तसा युरोपांत **टालेमी**चा **अल्माजेस्त** मानिला जात असे. पण १६ व्या शतकांत युरोपखंडांत जेव्हां ग्रहांचे सूक्ष्मवेध होऊं लागले तेव्हां **टालेमीच्या**

ग्रंथावरून केलेल्या गणितांत आणि वेधांत असलेलें महदंतर पाहून युरोपियन ज्योतिषी आश्चर्यचकित झाले. आणि असें कां होत असेल याविषयीं चोहोंकडे ऊहापोह सुरू झाला.

शेवटीं केप्लर ( इ. स. १५७१-१६३० ) या जर्मन ज्योतिष्यानें आपला गुरु जो टैकोब्राहे त्याचे वेध व आपण स्वतां घेतलेले वेध यांच्या साहाय्यानें मंगळ-कक्षेची आकृति काढून पाहिली. ती वर्तुलाकार न येतां अंडाकृति निघाली. या प्रमाणें बुधाच्या कक्षेची आकृतिही अंडाकार निघाली. म्हणून अंडाकृतीशीं निकट साम्य पावणारें जें दीर्घवर्तुल त्यासारख्या सर्वग्रहांच्या कक्षा असून त्यांच्या एका फोकसांत सूर्य असावा असें अनुमान करून या अनुमानाप्रमाणें गणित करून पहातां वेध आणि गणित यांत उत्तम मेळ बसूं लागला. याप्रमाणें त्यानें १८ वर्षे श्रम करून ग्रहगतीच्या संबंधानें पुढें सांगितलेले तीन महत्वाचे नियम इ. स. १६१८ यावर्षीं शोधून काढिले. ते त्याच्या नांवानेंच (Kepler's Laws) प्रसिद्ध आहेत.

१ ला नियमः – सर्व ग्रहांच्या कक्षा दीर्घवर्तुलाकार आहेत. आणि त्या कक्षांच्या एका नाभींत ( Focus ) सूर्य असतो.

२ रा नियमः – ग्रह सूर्याभोंवतीं फिरत असतां त्याचे मंदकर्ण सारख्या कालांत सारख्या क्षेत्रावरून जातात.

३ रा नियमः – ग्रहाच्या प्रदक्षिणाकालाचे वर्ग, त्यांच्या सूर्यापासून मध्यमांतराच्या घनाच्या प्रमाणांत असतात.

या तीन नियमांत ग्रहगतीचें सर्व रहस्य आलें आहे. पण असे साधे नियम तरी कां असावेत? हे नियम याहीपेक्षां जास्त साध्या नैसर्गिक नियमांचे परिणाम नसतील कशावरून ? असतील तर तो साधा नैसर्गिक नियम कोणता असावा ! अशी पुन्हां युरोपियन ज्योतिर्वेत्त्यांत तळमळ सुरू झाली.

या परम रहस्याचा शोध लावण्याचें यश इंग्लंद देशांतील प्रसिद्ध तत्वज्ञानी **न्यूटन** यानें इ. स. १६८५ यावर्षीं संपादिलें. आकाशस्थ सर्व जड पदार्थ परस्परांस ओढतात. ही गोष्ट फार प्राचीन कालापासून माहीत होती[२] पण या आकर्षणाचा नियम **न्यूटन**च्या पूर्वीं कोणासही माहीत नव्हता. तो यानेंच प्रथम शोधून काढला. तो असा आहे कीं, **गुरुत्वाकर्षण आकर्षक पदार्थाच्या प्रकृत्यंशाच्या ( द्रव्याचा ) सरळ प्रमाणांत** आणि आकृष्ट व आकर्षक

---

(१) Tycho Brahe' laissa a' Kepler sa collection d'observations Astronomiques, qui servirent a' ce dernier. avec les siennes, pour decouvrir les trois lois dites Lois de Kepler.

Histoire Abre'ge'e page 24.

**पदार्थांमधील अंतराच्या वर्गाच्या व्युत्क्रम प्रमाणांत असतें.** द्रव्याच्या या एका अत्यंत साध्या धर्मापासून केप्लरचे तीनही ग्रहगतिनियम सिद्ध होतात. व चंद्राच्या सर्वसंस्कारांची व भरती ओहोटीची उपपत्ति लागते असें त्यानें आपल्या **प्रिन्सिपिया** नांवाच्या ग्रंथांत उत्तम रीतीनें सिद्ध करून दाखविलें आहे.

केप्लरच्या ३ऱ्या नियमाची परीक्षाः—हा नियम खरा असेल तर ध्रुवांकाच्या-शेवटीं ( पान ८१ ) दिलेल्या ग्रहांच्या प्रदक्षिणाकाळाच्या दिनसंख्येच्या वर्गास त्यांच्या मंदकर्णाच्या घनानें भागिलें तर सर्व भागाकार समान आले पाहिजेत. ते तसे येतात हें खालील अंकांवरून पटेल.

| | | | |
|---|---|---|---|
| बुध | १३३४४१ | गुरु | १३३२९४ |
| शुक्र | १३३४१३ | शनि | १३३४०१ |
| पृथ्वी | १३३४०८ | वरुण | १३३४२२ |
| मंगळ | १३३४१० | इंद्र | १३३४०५ |

हालेचा धूमकेतु, १३३४५५

वरील अंकावरून केप्लरच्या तिसऱ्या नियमाच्या सत्यतेबद्दल पूर्ण खात्री होते. त्यामध्यें जी क्षुल्लक तफावत दिसते ती देखील आकर्षणशास्त्राच्याच नियमानुसार आहे. तो नियम असा आहे कीं, वरील अंकास सूर्य आणि ग्रह यांच्या प्रकृत्यंशाच्या बेरिजेच्या गुणोत्तरानें गुणिलें तरच समीकरण पूर्ण होतें. उदाहरणार्थ गुरूचा प्रकृत्यंश १ ÷ १०४७ आहे अथवा सुमारें एक सहस्रांश आहे. म्हणून वरील नियमाप्रमाणें १३३२९४ × १·००१ ÷ १ = १३३४२७ हें गुरूचें प्रमाण केप्लरच्या नियमाच्या पुरवणीप्रमाणें सिद्ध झालें. पुरवणीसह केप्लरचा नियम खालीं लिहिल्या-प्रमाणें असला पाहिजे.

$$\frac{a^3_{1,2}}{a^3_{3,2}} = \frac{P^2_{1,2}}{P^2_{3,2}} \times \frac{M_{1,2}}{M_{3,2}};$$ Moulton's Celestial Mechanics.

या समीकरणांत $a$, P, आणि M हीं अनुक्रमें ग्रहांचें अंतर, प्रदक्षिणाकाल आणि प्रकृत्यंशांची बेरीज आहेत आणि $_{1,2,3}$ हे तलस्थ अंक अनुक्रमें १ ला ग्रह सूर्य आणि २ रा ग्रह यांचें दर्शक आहेत. $a_{1,2}$ म्हणजे १ ला ग्रह आणि सूर्य यांचें

( २ ) आकृष्टशक्तिश्च मही तया यत्खस्थं गुरु स्वाभिमुखं स्वशक्त्या ।
आकृष्यते तत्पततीव भाती समं समंतात्कपतत्वियं खे ॥ पान १०३ – सि. शि. म.
अदृश्यरूपाः कालस्य मूर्तयो भगणाश्रिताः ।
शीघ्रमंदोच्चपाताख्या ग्रहाणां गतिहेतवः ॥
तद्वातरश्मिभिर्बद्धास्तैः सव्येतरपाणिभिः ।
प्राक्पश्चादपकृष्यंते यथासन्नं स्वादिङ्मुखम् ॥ – सूर्यसिद्धांत.

( ३ ) प्राचीन मताप्रमाणें ग्रह पृथ्वीभोंवतीं फिरत नाहींत. तर ते सूर्याभोंवतीं फिरतात हीं गोष्ट दखील वरील अंकावरून सिद्ध होते.

अंतर; $P_{1,2}$ म्हणजे १ ल्या ग्रहाचा सूर्याभोंवतीं प्रदक्षिणाकाल आणि $M_{1,2}$ म्हणजे १ ला ग्रह आणि सूर्य यांच्या प्रकृत्यंशांची बेरीज. याप्रमाणेंच छेद१दाचा अर्थ समजावा.

यापुढें रविमध्यगणिताची आम्हीं जी उपपत्ति देणार आहों तिचा आधार म्हटला म्हणजे केप्लरचे पहिले दोन नियम. या नियमांची उपपत्ति सांगणें गोलद्वय प्रश्नाचा विषय आहे. म्हणून तें काम सध्यां बाजूस ठेविलें पाहिजे. या नियमानुसारें गणित केलें तर गणित आणि वेध यांमध्यें उत्तम मेळ दिसून येतो. सद्यःहीच या दोन नियमांची उपपत्ति आहे असें समजावें. ज्यांस या भागाच्या पूर्वपीठिकेंत सांगितलेले सहा विषय चांगले अवगत असतील त्यांनीं वर सांगितलेला दिव्य शिल्पावरील ग्रंथ पहावा. त्यांत पान (७६) येथें वरील तीनही नियमांचें उपपादन केलें आहे.

## रविमध्यगणिताचें प्रदर्शन.

ग्रहगणितपद्धतींत ग्रहांचें रविमध्यगणित कसें करावें तें न्यास २ यांत दाखविलें आहे. पण न्यासांत नुसते अंक मांडून दाखविले असतात. अंकांनीं दाखविलेल्या गोष्टींचीं स्थानें, आकार आणि परिमाणें यांचें चित्र आकृतीशिवाय वाचकांच्या डोळ्यापुढें उभें रहात नाहीं. आणि या चित्राचा ठसा मनावर उमटल्याशिवाय गणिताचे निरनिराळे प्रकार, त्यांची अवश्यकता, धनर्णत्व, परमाल्पता, परमाधिक्य, इत्यादि औपपत्तिक गोष्टींविषयीं निःसंशय ज्ञान होत नाहीं. म्हणून बुधाचें उदाहरण घेऊन त्याचें चित्र काढून दाखवितों.

( आकृति २ री पहा. ) मागें नीचोपत्तिकथनांत पान (९६) येथें बुधकक्षेचे नीचोच्चादि अवयव अक्षरांनीं दाखविले आहेत. येथें तेच अंकांनीं दाखविले आहेत. प्रथम CS = ·२०५६ इतकी केंद्रच्युति घेऊन AMBR हें दीर्घवर्तुल काढलें. नंतर CS रेघ दोहोंकडे वाढवून A, B हीं नीचोच्च स्थानें ठरविलीं. नीचभोग ५३° आहे म्हणून ASR हा कोन ५३° चा करून SR ही सूर्यावरून दिसणारी **रेवती** नक्षत्राची दिशा ठरविली. म्हणून R हा बिंदु बुधकक्षेवरील भोग मोजण्याचें आरंभस्थान झालें. बुधकक्षेचा उत्तरसंपात २५ अंशावर आहे. म्हणून $\angle RSN = 25^\circ$ करून N हें उत्तरसंपातस्थान ठरविलें. त्याचप्रमाणें $\angle RSA + \angle ASQ = 184^\circ$ कोन करून मध्यम बुधस्थान Q, आणि मंदफल धन आहे म्हणून $\angle QSP = 15^\circ$ कोन करून रविमध्यबुधाचें स्थान P, हीं ठरविलीं.

दीर्घवर्तुल काढतेवेळीं आम्हीं CA = १ आणि CS = ·२०५६ अशीं मानें घेतलीं आहेत. म्हणून CA = ·३८७१ मानिलें तर, आणि आकृति बिनचूक

काढिली असेल तर SA = ·३०७५, SP = ·४४६५ आणि SB = ·४६६७ हीं मंदकर्णांचीं मापें असलींच पाहिजेत. ∠ACM = ९०° आहे म्हणून दीर्घवर्तुल-धर्मान्वयें SM = ·३८७१ = मध्यममंदकर्ण आहे.

NSV ही संपातरेषा कागदाच्या पातळींत आहे. NLV हा कक्षेचा भाग कागदापासून वर आहे आणि VBN हा भाग कागदाच्या खालीं आहे असें समजावें.

बुधाचा उत्तर संपात २५ अंशावर दाखविला आहे. येथें बुध आला म्हणजे तो क्रांतिवृत्तांत असतो म्हणून त्याचा शर शून्य असतो. येथून पुढें त्याचा भोग ११५ अंश होईपर्यंत त्याचा उत्तरशर वाढत जातो आणि L या स्थानीं उत्तरशर परम ( Maximum ) म्हणजे ७ अंश होतो. येथून त्याचा उत्तरशर कमी कमी होत जातो. आणि तो २०५ अंशावर आला म्हणजे क्रांतिवृत्तावरील दक्षिण संपातांत येतो. म्हणून येथें त्याचा शर दुसऱ्यानें शून्य होतो. येथून पुढें दक्षिण शरास प्रारंभ होतो. आणि तो ११५ अंशाच्या समोर, म्हणजे २९५ अंशावर आला म्हणजे त्याचा दक्षिण शर परम म्हणजे ७ अंश होतो. येथून N येथें येईपर्यंत त्याचा दक्षिण शर कमी होत जाऊन तो N येथें आला म्हणजे पुनः शून्य होतो. याप्रमाणें पुनः पुनः होत असतें.

## रविमध्यशर.

( आकृति ३ री. ) दोन समानव्यासांचीं तारेचीं वतुळ करून त्यांच्या पातळ्यांमध्यें इष्ट विक्षेपकोन होईल अशारीतीनें तीं परस्परांशीं बांधावीं, म्हणजे समोरासमोर दोन संपात उत्पन्न होतील. या दोन संपातबिंदूंस सांधून एक बारीक सळई बांधावी आणि तिला संपातरेषा म्हणावें. नंतर सळईचीं दोनही टोकें आपणांस एके ठिकाणीं दिसतील अशी ती सळई धरावी. म्हणजे सळईचा रोंख आपल्या एका डोळ्याकडे करावा. म्हणजे तीं दोन वृत्तें आकृति ३ येथें दाखविल्याप्रमाणें रेषाकार दिसतील. आणि दोनही संपात N बिंदूंत येतील.

या स्थितींत ANB रेषेस क्रांतिवृत्त म्हणावें आणि $C_3ND_3$ रेषेस कक्षावृत्त म्हणावें. आणि N यास उत्तरसंपात म्हणावें.

या स्थितींत खरोखर वर्तुलाकार कक्षामार्गानें फिरणारा ग्रह $C_3ND_3$ या रेषेंत $C_3$ पासून $D_3$ पर्यंत N बिंदूच्या पुढें व मागें लंबकाप्रमाणें हेलकावत आहे असें दिसेल. अर्थात् $ND_3 = NC_3 = 1$ मानिलें तर $ND_1, ND_2, ND_3$, $NC_1, NC_2, NC_3$, या रेषा त्या त्या स्थानच्या पातोनग्रहाच्या भुजज्या आहेत. आणि त्या त्या स्थानापासून $D_1E_1, D_2E_2$, इत्यादि रेषा ANB रेषेवर लंब

काढिल्या असल्यामुळें त्या, त्या त्या स्थानच्या शरज्या आहेत. सर्व त्रिकोण सरूप ( Similar ) आहेत. आणि $D_3NE_3$ हा कोन सर्व त्रिकोणास साधारण असून तो परमशर म्हणजे विक्षेपायेवढा आहे.

सरूपत्रिकोणाच्या धर्माप्रमाणें खालील प्रमाणयुगुलें उत्पन्न होतातं.

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | $ND_3$ | : | $D_3E_3$ | : : | $ND_1$ | : | $D_1E_1$, |
| म्हणजे | त्रिज्या | : | विक्षेपज्या | : : | पातोनग्रहज्या[1] | : | शरज्या, |
| | १ | : | विक्षेपज्या | : : | पातोनग्रहज्या | : | शरज्या, |

म्हणून विक्षेपज्या × पातोनग्रहज्या = शरज्या.

हें रविमध्यग्रहाचा शर आणण्याचें समीकरण सिद्ध झालें. पान ७८ वरील ९ व्या कोष्टकाचे ध्रुवांक पहा. ग्रहांच्या परस्परांकर्षणामुळें त्यांचे विक्षेप हळूं हळूं कमी किंवा जास्ती होत असतात. म्हणून शेकडों वर्षांचे पुढील किंवा मागील ग्रहशर आणितांना त्यांच्या तात्कालिक विक्षेपाचें मान समजावें लागतें. हा शतवार्षिक फरक ध्रुवांकांत + ६″·३ $t$ इत्यादि अंकांनीं दर्शविला आहे.

**उदाहरणः**—पातोनबुध ३० अंश आहे तर त्याचा शर केवढा असेल ? बुधविक्षेप ४२०′·२, याची ज्या ·१२१८७ आणि ३० अंशांची ज्या ·५०००० यांचा गुणाकार ·०६०९३५ ही शरज्या झाली. याचा कंस २०९′·६ हा शर झाला. इतर ग्रहांचे विक्षेप अल्प आहेत, म्हणून विक्षेपज्येबद्दल विक्षेपचाप ( कंस ) घेतला तरी चालतें.

२३ व्या कोष्टकांतील सायन सूर्यावरून त्याची क्रांति आणण्याच्या रीतीची उपपत्ति पूर्णपणें अशीच आहे. तेथें सायन सूर्य म्हणजे क्रांतिपातोनसूर्य समजावा. म्हणूनः—

परमक्रांतिज्या × सायनसूर्यज्या = सूर्यक्रांतिज्या.

## परिणति.

शरगणिताची उपपत्ति समजून घेण्यासाठीं जी सामुग्री तयार केली आहे ती घेऊन सळई आपल्या डोळ्यासमोर आडवी धरावी. अशी कीं, त्यापैकीं एका वर्तुळाची पातळी आपल्या दृष्टिरेषेवर लंब होईल. ज्या वर्तुळाची पातळी दृष्टिरेषेवर लंब आहे ते वर्तुळ वर्तुलाकार दिसेल पण दुसरें वर्तुळ दीर्घवर्तुलाकार दिसेल. त्यांपैकीं पूर्ण वर्तुलास क्रांतिवृत्त म्हणावें आणि दीर्घवर्तुलास ग्रहकक्षा म्हणावें.

( आकृति ४ थी. ) ABCD हें क्रांतिवृत्त आहे. APOC ही दीर्घवर्तुलाकार ग्रहकक्षा म्हणजे विक्षेपवृत्त आहे. AC ही संपातरेषा, P हें विक्षेपवृत्तावरील ग्रहाचें स्थान, आणि DAO हा गोलीय विक्षेपकोन आहे, असें समजावें.

( १ ) पुढील विवरणांत लाघवासाठीं भुजज्या शब्दाबद्दल ज्या हा शब्द वापरला आहे.

AC व्यासावर लंब अशी E मध्यांतून EOD त्रिज्या काढ. P बिंदूतून EOD रेषेशीं समांतर अशी KPG रेषा काढ. EP सांधून EPQL ही रेषा काढ. आणि G बिंदूतून EL रेषेवर GQ लंब कर.

प्रक्षेपविधीच्या ( Projection ) धर्माप्रमाणें पहातां DAO हा विक्षेपकोन शून्य असता तर APOC दीर्घवर्तुलार्ध AGDC वर्तुलार्धाशीं एकरूप झालें असतें. आणि P बिंदु G बिंदूवर पडला असता. म्हणजे G हें त्याचें क्रांतिवृत्तावरचें स्थान झालें असतें. आणि AP कंस AG कंसायेवढा झाला असता.

पण विक्षेपामुळें G हें स्थान P पर्यंत AC व्यासाकडे मागें हटलें. आतां E आणि P बिंदूतून जाणारी अशी एक पातळी ADC या क्रांतिवृत्ताच्या पातळीवर लंब (Perpendicular) केली तर, म्हणजे EPL रेषा काढली तर P बिंदूचें ( ग्रहाचें ) L हें क्रांतिवृत्ताच्या परिघावर परिणत केलेलें ( Reduced ) स्थान होईल. P ग्रह क्रांतिवृत्तांत फिरता तर तो G स्थानीं दिसला असता. पण तो आपल्या विक्षेपवृत्तांत फिरत असल्यामुळें L हें त्याचें क्रांतिवृत्तावर परिणत झालेलें स्थान आहे. LP ही तेथील शराची उत्क्रमज्या ( LE = १ मानून ) आहे.

सारांश ALG हा कंस आणि GAP हा गोलीयकोन, हे दिले तर त्यावरून GL हा कंस किंवा GQ ही त्याची भुजज्या ठरविणें हा या प्रकरणाचा मुख्य विषय आहे. ALG कंस A संपातापासून मोजलेला विक्षेपवृत्तावरील ग्रहाचा भोग आहे. आणि AL कंस त्याच ग्रहाचा क्रांतिवृत्तावर परिणत केलेला भोग आहे. या दोहोंचें अंतर जो LG कंस त्यालाच **परिणति** संस्कार म्हणतात.

दीर्घवर्तुलाच्या धर्माप्रमाणें:—

$$ED : OD :: KG : PG = \frac{OD \cdot KG}{ED} \ldots (१)$$

PEK आणि PGQ हे सरूप त्रिकोण आहेत म्हणून:—

$$PE : EK :: PG : GQ = \frac{EK \cdot PG}{PE} \ldots (२)$$

समीकरण (२) यांत समीकरण (१) यांतील PG ची किंमत मांडली तर समीकरण (३) उत्पन्न होतें.

$$GQ = \frac{EK \cdot OD \cdot KG}{ED \cdot PE} \ldots\ldots\ldots\ldots\ldots\ldots (३)$$

यांत GQ = परिणतिज्या.
EK = पातोनग्रहकोटिज्या.
OD = विक्षेपोत्क्रमज्या = ( १ − कोटिज्या )

KG = पातोनग्रहज्या.
ED = त्रिज्या = १.
PE = शरकोटिज्या = १ सुमारें. विक्षेप अल्प असतात म्हणून.

आणि त्रिकोणमितीप्रमाणें एकाच कंसाची भुजज्या आणि कोटिज्या यांचा गुणाकार त्या कंसाच्या दुप्पटकंसाच्या भुजज्येच्या अर्धपट असतो.[1]

या किंमती समीकरण ( ३ ) यांत ठेविल्या तर परिणतिज्येचें समीकरण सिद्ध होतें. जसें:—

परिणतिज्या = पातोनग्रहकोटिज्या × विक्षेपोत्क्रमज्या × पातोनग्रहज्या.
= $\frac{1}{2}$ विक्षेपोत्क्रमज्या × २ पातोनग्रहज्या.

आकृति ४ थी वरून स्पष्ट दिसतें कीं, प्रथम व तृतीय पदीं पातोनग्रह असतां हा परिणतिसंस्कार ऋण असतो. इतरपदीं असतां धन असतो. म्हणून,

परिणतिज्या = − $\frac{1}{2}$ विक्षेपोत्क्रमज्या × द्विगुणपातोनग्रहज्या.

उदाहरणः— बुधाचा विक्षेप ७ अंश, याची कोटिज्या ·९९२५५, उत्क्रमज्या १ − ·९९२५५ = ·००७४५, याचा कंस २५·४ कला, याचें अर्ध १२′·७; म्हणून बुधकक्षापरिणति = − १२′·७ sin 2 z. याप्रमाणें इतर ग्रहांचीं परिणतिसूत्रें आणिलीं आहेत. ( पान ७८ पहा. )

टीपः–वरील सूत्रावरून दिसतें कीं, A आणि C या दोन संपात स्थानीं आणि O आणि त्याच्या समोरच्या परमशरस्थानीं द्विगुणपातोनग्रहज्या शून्य असते. म्हणून या ४ जागीं हा संस्कार ० असतो.

## ग्रहांचें सूर्याभोंवतीं फिरणें.

( Kepler's Problem. )

या प्रकरणाला केप्लरचा प्रश्न म्हणतात. परमाणुगणितांतील लाग्रॉंजच्या सिद्धांताचें साहाय्य घेतल्याशिवाय मंदफलाची सूक्ष्मश्रेणी ( ज्यो. ग. पान २१७

---

( १ ) च्यापयोरिष्टयोर्दोर्ज्ये मिथः कोटिज्यका हते ।
त्रिज्याभक्ते तयोरैक्यं स्याच्चापैक्यस्य दोर्ज्यका ॥
चापांतरस्य जीवा स्यात् तयोरंतर संमिता ।
— भास्कराचार्य.

याच अर्थाचा त्रिकोणमितींतील फार्म्युला खालीं देतों.

$\sin (A+B) = \sin A . \cos B + \cos A . \sin B.$

यांत $A = B$ असेल तर,

$\sin 2 A = \sin A . \cos A + \cos A \sin A,$
$= 2 \sin A \cos A.$

म्हणून $\frac{1}{2} \sin 2 A = \sin A . \cos A.$

पहा.) उत्पन्न करितां येत नाहीं. पण या सिद्धांतापर्यंत ज्यांची मजल पोंचली आहे असे वाचक फारच कमी. म्हणून भूमिति, शंकुच्छिन्न आणि त्रिकोणमिति या तीन आधारांवरच आम्हीं पुढील उपपत्ति रचली आहे.

गणितशास्त्रकोविद् गणितसौकर्यासाठीं स्वल्पांतराची[१] उपेक्षा करीत असतात. म्हणजेः—

(१) कोन अल्प असेल तर त्याचा कंस, भुजज्या आणि स्पर्शरेषा यांचा अभेद मानणें म्हणजे हीं तीनही मानें समान समजणें.

(२) लहान कोनाची कोटिज्या त्रिज्यासमान म्हणजे एक मानणें आणि,

(३) द्विपदसिद्धांताप्रमाणें श्रेढी उत्पन्न करून तिचीं पहिलीं दोनच पदें जमेस धरून बाकीच्या पदांची उपेक्षा करणें.

या गोष्टी त्यांस संमत असतात, म्हणून पुढील उपपादनांत आम्हींही हेच उपाय योजिले आहेत.

**व्याख्या**–दीर्घवर्तुलाच्या मोठ्या व्यासावर काढलेल्या वर्तुळास सहकारी वर्तुल ( Auxiliary Circle ) म्हणतात.

(आकृति ५ वी पहा.) येथें AB व्यासावर ALQB ही एक दीर्घवर्तुलाकार ग्रहकक्षा आहे. आणि AOPBW हें त्याच व्यासावर एक सहकारीवर्तुल आहे. C हा त्याचा मध्यबिंदु आहे. S,H हे फोकस आहेत आणि A,B हे अनुक्रमें नीच आणि उच्च बिंदु आहेत.

असें समजा कीं O हा कल्पित मध्यमग्रह C मध्याभोंवतीं CO त्रिज्येनें सारख्या वेळेंत सारखीं क्षेत्रें करीत ( कापीत ) सहकारी वर्तुलांत फिरतो. P हा दुसरा कल्पित ग्रह S या बिंदूभोंवतीं SP रेषेनें सारख्या वेळेंत सारखीं क्षेत्रें कापीत सहकारी वर्तुलांतच फिरतो. आणि Q हा तिसरा खरा ग्रह S या सूर्याभोंवतीं SQ रेषेनें केप्लरच्या नियमाप्रमाणें सारख्या वेळेंत सारखीं क्षेत्रें कापीत ALQB या दीर्घवर्तुलाकार कक्षेंत फिरतो. या तीनही ग्रहांचे प्रदक्षिणाकाल समान आहेत.

A, B हे बिंदु सहकारीवर्तुलास आणि दीर्घवर्तुलास साधारण आहेत: आणि AB रेषेनें त्यांचे दोन समान भाग होतात. CK, MP रेषा AB वर लंब आहेत.

---

(१)

$$\left.\begin{array}{l} \sin\ a = a - \frac{a^3}{6}\cdots\cdots \\ \cos\ a = 1 - \frac{a^2}{2}\cdots\cdots \\ \tan\ a = a + \frac{a^3}{3}\cdots\cdots \\ (1+a)^n = (1+na) \end{array}\right\}$$

या सूत्रांत $a$ बराच लहान कंस किंवा अपूर्णांक असेल तर त्याचे वर्ग, घन आदिकरून घात तितक्याच प्रमाणानें लहान होत जातात म्हणून ते उपेक्षणीय होतात. जसें जर $a =$ ·०१ तर, $a^2 =$ ·०००१, $a^3 =$ ·०००००१.

असें समजूं कीं, हे तीनही ग्रह शर्यतीच्या घोड्यांप्रमाणें A या नीचबिंदूपासून एकाच क्षणीं निघाले. नंतर कांहीं कालावधींत ( समजा १०० दिवसांत ) P ग्रह S भोंवतीं ASP क्षेत्र कापून P स्थानीं आला. तर O ग्रह त्याच अवधींत P स्थानीं येणार (येऊं शकणार) नाहीं. येईल तर तो C मध्याभोंवतीं ACP क्षेत्र चालला असें होईल. पण ACP क्षेत्र, ASP क्षेत्रापेक्षां, PCS त्रिकोणाच्या क्षेत्रानें मोठें आहे. म्हणून O यानें आपला समान क्षेत्र चालण्याचा नियम पाळण्यासाठीं P च्या मागें O या स्थानीं असलें पाहिजे, असें कीं, ACO क्षेत्र, ASP क्षेत्राशीं समान होईल. यास्तव ACO क्षेत्र, ASP क्षेत्राबरोबर आहे असें मानून ACP आणि ACO या कोनांचा संबंध आपण काढूं.

लाघवासाठीं केलेल्या पुढील संज्ञा ध्यानांत ठेवाव्या.

| | | | |
|---|---|---|---|
| $\angle ACO$ | = मध्यमकेंद्र[1] | = $nt$ | = Mean Anomaly. |
| $\angle ACP$ | = च्युतकेंद्र | = $u$ | = Excentric Anomaly |
| $\angle PCQ$ | = परिणाति | = $\beta$ | = Reduction. |
| $\angle ASQ$ | = स्पष्टकेंद्र | = $\theta$ | = True Anomaly. |
| $CS/CP$ | = केंद्रच्युति | = $e$ | = Excentricity. |
| AC | = मध्यमांतर | = $a$ | = Mean Distance. |
| QS | = मंदकर्ण | = $r$ | = Radius Vector. |
| $\angle CQS$ | = मध्यगतकोन | = $y$ | = Intermediate Angle. |

ACP क्षेत्रांतून PCO सेक्टराचें क्षेत्र वजा केलें म्हणजे ACO क्षेत्र बाकी रहातें. आणि ACP क्षेत्रांतून PCS हें त्रिकोणक्षेत्र वजा केलें म्हणजे ASP क्षेत्र रहातें. यावरून असें म्हणतां येईल कीं, मध्यमकेंद्र आणि स्पष्टकेंद्र यांचा साक्षात् संबंध नाहीं, पण मध्यस्थ जें च्युतकेंद्र त्याच्या द्वारें परंपरेचा संबंध आहे. म्हणून प्रथम $nt$ आणि $u$, आणि नंतर $u$ आणि $\theta$ यांचे संबंध आणून त्या दोन संबंधांच्या मिलाफापासून $nt$ आणि $\theta$ यांचा संबंध उत्पन्न केला पाहिजे. या संबंधैक्यालाच **मंदफल** म्हणतात.

प्रथम $nt$ आणि $u$ यांचा संबंध काढणें:-

ACO क्षेत्र = ASP क्षेत्र. ( प्रतिज्ञा. )

ACP क्षेत्र − ACO क्षेत्र = ACP क्षेत्र − ASP क्षेत्र†

(१) मध्यमगणितांत ($nt + E$) याला मध्यमभोग म्हटलें आहे. ग्रह आपल्या नीचावर असतेवेळीं गणितारंभ मानिला तर ( $nt + E - E$ ) $= nt$ हें मध्यमकेंद्र होतें. म्हणून लाघवासाठीं आम्हीं तसें मानिलें आहे.

(†) समानां योगे वियोगे समतैव । भास्करीय बीजगणित.
(Euclid's Elements. Axioms 2 and 3.)

म्हणून $\quad$ PCO सेक्टरचें क्षेत्र = PCS त्रिकोण क्षेत्र.

पण $\quad$ PCO सेक्टरचें क्षेत्र $= \frac{1}{2}$ PC. PO कंस.

$= \frac{1}{2} PC.\ PC \angle PCO.$*

$= \frac{1}{2} PC^2.\ \angle PCO.$

आणि $\quad$ PCS त्रिकोण क्षेत्र $= \frac{1}{2}$ PC. SE; (PCE वर SE लंब आहे).

$= \frac{1}{2}$ PC. CS sin ACP.

म्हणून $\quad \frac{1}{2} PC^2 \angle PCO = \frac{1}{2} PC.\ CS \sin ACP.$

$\angle PCO = (CS/CP) \sin ACP.$

$\angle PCO = e \sin u.$

पुन्हां $\quad \angle ACO = \angle ACP - \angle PCO.$

म्हणजे $\quad nt = u - e \sin u. \quad$ ..................( १ )

अथवा $\quad u = nt + e \sin u.$

याप्रमाणें P च्या संबंधानें O चें स्थान ठरलें. आतां P च्या संबंधानें Q चं स्थान ठरविलें पाहिजे.

प्रतिज्ञेप्रमाणें (Hypothesis) P आणि Q ग्रहांचे प्रदक्षिणाकाल समान असून कक्षाक्षेत्रें असमान असल्यामुळें ते जर A पासून एकाच क्षणीं निघाले तर कोणत्याही समान अवधींत त्यांनीं S भोंवतीं आक्रमलेल्या क्षेत्रांचें गुणोत्तर त्यांच्या कक्षावृत्तांच्या क्षेत्रांच्या गुणोत्तराबरोबर असलें पाहिजे. म्हणजेः–

2 AKB क्षेत्र : 2 ALB क्षेत्र : : ASP क्षेत्र : ASQ क्षेत्र.

असें प्रमाण असलें पाहिजे. पणः–

2 AKB क्षेत्र : 2 ALB क्षेत्र : : CK : CL ( शं. च्छि. )

म्हणून

ASP क्षेत्र : ASQ क्षेत्र : : CK : CL.

पण P बिंदूपासून ALB या दीर्घवर्तुलार्धाला Q बिंदूंत छेदणारी अशी एक PQM रेषा AB रेषेवर लंब काढली तर पुढील प्रमाण उत्पन्न होतें.

CK : CL : : MP : MQ $\qquad$ (शं. च्छि.)

म्हणून

ASP क्षेत्र : ASQ क्षेत्र : : MP : MQ.

असें प्रमाण असलें पाहिजे. व हें प्रमाण ASP व ASQ या क्षेत्रामध्यें आहे ही गोष्ट खालीं सिद्ध करून दाखवितों.

---

* $\angle$PCO म्हणजे PCO कोनासमोरील कंसाचें चापीयमान. ( Circular Measure ). =रूपात्रिज्यामान.

AKPM क्षेत्र : ALQM क्षेत्र : : MP : MQ (शं. च्छि.)
SPM त्रिकोण : SQM त्रिकोण : : MP : MQ (त्रि. मि.)
(AKPM − SPM) : (ALQM − SQM) : : MP : MQ.
म्हणजे ASP क्षेत्र : ASQ क्षेत्र : : MP : MQ हें सिद्ध.

यावरून अशी एक गोष्ट सिद्ध झाली कीं, जर P आणि Q ग्रह A पासून एकाच क्षणीं निघाले तर Q ग्रह नेहमीं PM या लंब रेषेंत असतो. म्हणजे P च्या संबंधानें Q चें स्थान निश्चित झालें. यावरून ACP कोन आणि ASQ कोन म्हणजे $u$ आणि $\theta$ या कोनांचा संबंध ठरवितां येतो.

$\angle ASQ = \angle ACP + \angle PCQ + \angle CQS$ ( युक्लीड पु. १, ३२. )
म्हणजे $\theta = u + \beta + y$. ... ... ... ... ... ( २ )

वरील समीकरणांतील $\beta$ आणि $y$ या दोन कोनांची किंमत कळली तर $\theta$ आणि $u$ यांचा संबंध निघाला असें म्हणतां येईल. म्हणून प्रथम $\beta$ या कोनाचें मान काढूं.

वाचकांच्या लक्षांत येऊन चुकलें असेल कीं, मागें सांगितलेला कक्षापरिणाति-संस्कार आणि हा $\beta$ कोन यांची जात एकच आहे. भेद इतकाच कीं, परिणाति-संस्काराचा आरंभ कक्षापातापासून होतो. पण या संस्काराचा आरंभ A या नीचापासून होतो. म्हणून परिणति संस्काराच्या पुढील समीकरणांत

**परिणतिज्या**= − $\frac{1}{2}$ विक्षेपोत्क्रमज्या × द्विगुणपातोनग्रहज्या.

विक्षेपाबद्दल केंद्रच्युति, पातोनग्रहाबद्दल च्युतकेंद्र, व उत्क्रमज्येबद्दल ( १−कोटिज्या ) असा फेरफार केला तर या $\beta$ कोनाचें समीकरण उत्पन्न होईल. जसें:−

$\beta = -\frac{1}{2}(1 - \cos e)\sin 2u$.

यांत $\frac{1}{2}(1 - \cos e)$ या पदाचा किंमत $e$ रूपाची काढली म्हणजे हा संस्कार $nt = u - e \sin u$ या समीकरणास जोडतां येईल. यहांचें मंदफलार्ध किंवा $e$ कोन हा नेहमीं लहान असतो. म्हणून $\sin e = e$ असें मानितां येतें.

$\therefore \quad (1 - \cos e)(1 + \cos e) = \sin^2 e = e^2$

म्हणजे $\quad (1 - \cos e) = \dfrac{e^2}{(1 + \cos e)} = \dfrac{e^2}{(1+1)} = \dfrac{e^2}{2}$.

म्हणून $\quad \beta = -\frac{1}{4} e^2 \sin 2u$. ... ... ... ... ... (३)

आतां $y$ कोनाची किंमत काढूं:−

$$\sin y = \frac{SE'}{SQ};$$ (QSE′ रेषेवर SE′ लंब आहे म्हणून. )

$$SE' = CS \sin SCQ.$$
$$= CS \sin (u + \beta).$$

पण $\beta = -\frac{1}{4} e^2 \sin 2u.$

म्हणून $SE' = CS \sin (u - \frac{1}{4} e^2 \sin 2u).$

ग्रहमालेंत $e$ कोन लहान असतो. म्हणून $\frac{1}{4}e^2$ हा कोन तर फारच लहान म्हणून उपेक्षणीय होतो[1]. म्हणून असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं कीं,

$SE' = CS \sin u$; आणि

$$\sin y = \frac{SE'}{SQ} = \frac{CS \sin u}{SQ}.$$

या अपूर्णांकाच्या अंशच्छेदास AC नें भागिलें तर त्यांची किंमत बदलत नाहीं. फक्त रूपांतर मात्र होतें.

म्हणून

$$\sin y = \frac{\frac{CS}{AC} \sin u}{SQ/AC} = \frac{e \sin u}{SQ/AC}$$

वरील समीकरणांत SQ/AC या अपूर्णांकाची किंमत $u$ रूपात्मक (in terms of $u$) काढून ती छेदस्थानीं मांडली म्हणजे $\sin y$ ची किंमत पूर्णपणें $u$ रूपात्मक सिद्ध होईल. SQ म्हणजे मंदकर्ण.

**उद्देशक**–ग्रहाचें च्युतकेंद्र ($u$) दिलें असतां त्यापासून त्याचा मंदकर्ण (SQ) काढावयाचा.

(आकृति ६) येथें AOB सहकारी वर्तुळ आहे. AQB दीर्घवर्तुळार्ध आहे. S या नाभ फोकसांत सूर्य आहे. Q हा ग्रह आहे. म्हणून SQ हा मंदकर्ण झाला. SQ = $r$ समजा.

Q बिंदूपासून AB व्यासावर QM लंब टाक. आणि तो सहकारी वर्तुळाम O बिंदूंत मिळेपर्यंत वर वाढीव. ACO कोन = च्युतकेंद्र = $u$ समजा; AC = CO = व्यासार्ध = $a$; CS/AC = केंद्रच्युति = $e$.

---

(१) पान ७८ कोष्टक ७ यांत Sin $2g$. उपकरणाच्या ज्या गुणककला (coefficient) आहेत त्या $\frac{5}{4}$ $e^2$ च्या किंमती आहेत. त्यांस ५ नीं भागिलें म्हणजे $\frac{1}{4}e^2$ ची किंमत येते. सदर कलांचा पंचमांश बुध ग्रह सोडून इतर ग्रहांच्या संबंधानें उपेक्षणीय म्हणण्यास हरकत नाहीं. बधाच्या कला १७८·९, यांचा पंचमांश ३६ कला या मात्र उपेक्षणीय नाहींत. तथापि उपकरणांतील थोड्याशा कसरीचा परिणाम संस्कारावर फारसा होत नाहीं.

आतां ACO कोनावरून SQ काढणें:-

$OM = OC \sin OCM = a \sin u.$

$QM = \sqrt{1-e^2}. OM = \sqrt{1-e^2}. a \sin u.$

$MS = CS - CM = ae - a \cos u.$

$SQ^2 = QM^2 + MS^2.$

$= (1-e^2) a^2 \sin^2 u + a^2e^2 + a^2 \cos^2 u - 2a^2e \cos u.$

$= a^2 \sin^2 u - a^2e^2 \sin^2 u + a^2e^2$

$+ a^2 \cos^2 u - 2 a^2e \cos u.$

पण $a^2 \sin^2 u + a^2 \cos^2 u = a^2.$

आणि $a^2e^2 = a^2e^2 \sin^2 u = a^2e^2 ( 1-\sin^2 u ) = a^2e^2 \cos^2 u.$

म्हणून $SQ^2 = a^2 + a^2e^2 \cos^2 u - 2 a^2e \cos^2 u.$

$SQ = a - ae \cos u.$

$r = a ( 1 - e \cos u ).$

$\frac{r}{a} = ( 1 - e \cos u ).$

---

वर असें सिद्ध केलें आहे कीं, $\sin y = \frac{e \sin u}{SQ/AC}$

यांत $SQ/AC = r/a = ( 1 - e \cos u ).$

म्हणून $\sin y = e \sin u/( 1 - e \cos u ).$

$= e \sin u ( 1 - e \cos u )^{-1}$

$= e \sin u ( 1 + e \cos u ).$

$= e \sin u + e^2 \sin u \cos u,$

अथवा $y = e \sin u + \frac{1}{2} e^2 \sin 2 u.$ ... ... ... (४)

याप्रमाणें $\beta$ आणि $y$ या कोनांचीं मानें समीकरणें (४) व (३) यांत सिद्ध केलेलीं, समीकरण (२) यांत मांडिलीं तर $\theta$ आणि $u$ यांचा संबंध दाखविणारें समीकरण सिद्ध होतें. जसें—

$\theta = u + e \sin u + \frac{1}{2} e^2 \sin 2 u.$

$- \frac{1}{4} e^2 \sin 2 u.$

$= u + e \sin u + \frac{1}{4} e^2 \sin 2 u.$

परंतु $nt = u - e \sin u.$

म्हणून

$\theta - nt = 2 e \sin u + \frac{1}{4} e^2 \sin 2 u.$ ... ... ... (५)

याप्रमाणें $\theta$ आणि $nt$ यांचा संबंध निघाला. पण तो $nt$ रूपात्मक नाहीं. $u$ रूपात्मक आहे. आपणांस मंदफलाचें व मंदकर्णाचें गणित $nt$ (मंदकेंद्र) या उपकरणानें करावयाचें असतें. म्हणून (५) समीकरणांतील $u$ ना $nt$ चें रूप दिलें पाहिजे.

हें काम $u = nt + e \sin u$ या समीकरणाच्या साहाय्यानें लाग्रांजच्या सिद्धांतानुसारें करितां येतें. आमच्या ज्योतिर्गणितांत मंदफलें व मंदकर्ण यांच्या ज्या मूळाधार सरण्या दिल्या आहेत त्या या लाग्रांज सिद्धांतानुसारें सिद्ध केलेल्या आहेत. पण हेंच काम स्वल्पांतराचा अंगीकार केल्यास (थोडी कसर गेली तरी चिंता नाहीं असें मानल्यास) थोड्याशा श्रमानें करितां येतें. या प्रकाराला असकृत्कर्म किंवा साम्यपरंपरापद्धति (Successive Approximation) म्हणतात.

जसें:—

$$u = nt + e \sin u \quad \ldots \quad \ldots \quad \ldots \quad \ldots \quad \ldots \quad \ldots (६)$$

यांत $e \sin u$ या पदाची किंमत फार झाली तर $e$ होते. आणि $e$ हा कोन इतका लहान आहे कीं, $u$ किंवा $nt$ यांच्याशीं लाऊन पाहिला तर तो उपेक्षणीय ठरतो. म्हणून $u = nt$ हें प्रथम स्थूल साम्य झालें. ही किंमत समीकरण (६) यांत मांडली तर $u = nt + e \sin nt$. हें द्वितीय म्हणजे पहिल्यापेक्षां जास्त सूक्ष्म साम्य झालें.

समीकरण (५) याच्या उजव्या बाजूच्या पहिल्या पदांत दुसरें साम्य आणि दुसऱ्या पदांत पहिलें साम्य मांडलें तर $nt$ रूपात्मक पुढें लिहिलेलें समीकरण सिद्ध होतें.

$$\begin{aligned}
\theta - nt &= 2\, e \sin (nt + e \sin nt) + \tfrac{1}{4} e^2 \sin 2\, nt. \\
&= 2\, e \sin (nt + ent) \quad + \tfrac{1}{4} e^2 \sin 2\, nt. \\
&= 2\, e \,\{ (\sin nt \cdot \cos ent) + (\cos nt \cdot \sin ent) \} \\
&\qquad + \tfrac{1}{4} e^2 \sin 2\, nt. \\
&= 2\, e \,\{ (\sin nt \times 1) \quad + (\tfrac{1}{2} e \sin 2\, nt.) \} \\
&\qquad + \tfrac{1}{4} e^2 \sin 2\, nt. \\
&= 2\, e \sin nt + e^2 \sin 2\, nt + \tfrac{1}{4} e^2 \sin 2\, nt. \\
&= 2\, e \sin nt + \tfrac{5}{4} e^2 \sin 2\, nt.
\end{aligned}$$

पण $\theta - nt =$ मंदफल म्हणून:—

$$\text{मंदफल} = 2\, e \sin nt + \tfrac{3}{4} e^2 \sin 2\, nt. \quad \ldots \quad \ldots \quad \ldots \quad \ldots (७)$$

आतां उदाहरणार्थ ७८ पानावरील ७ व्या कोष्टकांतील सूर्याच्या मंदफलाचें सूत्र उत्पन्न करून दाखवितों. भूकक्षेची केंद्रच्युति ( अवांतर माहिती पाहा. ) $e$ = .०१६७५ आहे म्हणून $e^2$ = .०००२८१. त्रिज्यातुल्यकंसांत २०६२६५ विकला असतात. म्हणून $e$ = ( .०१६७५ × २०६२६५″ ) = ३४५१ वि. $2e$ = ६९१० विकला = ११५.२ कला.

$\frac{5}{4} e^2$ = ( .०००२८१ × २०६२६५″ × १.२५ ÷ ६० ) = १.२५ क.

या किंमती वरील समीकरणांत ठेविल्या तर—

रविमंदफल = ११५′.२ रविकेंद्रज्या = $115'.2 \sin g.$
+ १.२ द्विगुणरविकेंद्रज्या. + $1.2 \sin 2g.$

---

## मंदकर्ण.

पूर्वी रूपमित त्रिज्या कल्पून $r/a = (1 - e\cos u)$ हें मंदकर्णाचें समीकरण उत्पन्न केलें आहेच. यांतील $u$ ला $u = nt + e\sin nt$ या समीकरणाच्या मदतीनें वर दाखविलेल्या साम्यपरंपरापद्धतीनें $nt$ चें रूप देऊन मंदकर्ण आणि मंदकेंद्र यांचा संबंध दाखविणारें समीकरण सिद्ध करून दाखवितों.

$\frac{r}{a} = 1 - e\cos u$ यांत $u$ ची वरील किंमत मांड.

$= 1 - e\cos(nt + e\sin nt)$.*

$= 1 - e\cos nt + e^2\sin^2 nt$. यांत

$\sin^2 nt = \frac{1}{2}(1 - \cos 2nt)$; †

---

( * ) याचें निष्काशन त्रिकोणमितिसूत्राप्रमाणें असें आहे—

$\cos(A + B) = \cos A . \cos B - \sin A . \sin B$

$\therefore e\cos(nt + ent) =$

$e\left\{(\cos nt . \cos ent) - (\sin nt . \sin ent)\right\}$

यांत $e$ हा लहान अपूर्णांक आहे म्हणून $ent$ हा कोनही लहान आहे. म्हणून या लहान कोनाची कोटिज्या १ मानिता येईल. म्हणून,

$e\cos(nt + ent) = e\cos nt - e^2\sin^2 nt.$

( † ) $\cos(A + B) = \cos A . \cos B - \sin A . \sin B$

$A = B$ असेल तर

$\cos 2A = \cos^2 A - \sin^2 A$

$= (1 - \sin^2 A - \sin^2 A)$

$= (1 - 2\sin^2 A)$

$\therefore 2\sin^2 A = 1 - \cos 2A$

$\sin^2 A = \frac{1}{2}(1 - \cos 2A)$

$$\therefore \frac{r}{a} = 1 - e \cos nt + \frac{e^2}{2} ( 1 - \cos 2 nt. )$$

$$r = a \left\{ \left( 1 + \frac{e^2}{2} \right) - e \cos nt - \frac{e^2}{2} \cos 2 nt \right\}$$

उदाहरणार्थ, वरील मूलसूत्रावरून रविमंदकर्णसूत्र आणून दाखवितों. सूर्याचा मध्यम मंदकर्ण = $a$ = १; $e$ = ·०१६७५ आणि $\frac{e^2}{2}$ = ·०००१४ या किंमती-वरील मूलसूत्रांत मांडल्या तर पुढील रविमंदकर्णसूत्र तयार होतें.

रविमंदकर्ण = १·०००१४ – ·०१६७५ केंद्र कोज्या
– ·०००१४ द्वि. कें. कोज्या.

---

कक्षाकेंद्रच्युति अल्प असेल तर उच्चाजवळच्या फोकसांत (Upper Focus) बसून ग्रहाकडे पहाणाऱ्यांस ग्रह सार्वकाल मध्यमगतीनें फिरत आहे असें दिसेल असें सिद्ध करावयाचें. (आकृति ५ वी पहा.) पान ११ वरील टीपेची सिद्धता.

P पासून CO रेषेस समांतर अशी PHK रेषा काढ आणि तिजवर CK लंब कर. PK रेघ AB रेषेस H बिंदूंत छेदिते. PM रेघ OC वर लंब आहे.

आतां CS = CH असें सिद्ध करावयाचें.
ES = PO = PM = CK
आणि CS = ES. cosec $u$. कारण ∠CSE $u$ ची कोटि आहे.
CH = CK. cosec $nt$. कारण ∠CHK $nt$ ची कोटि आहे.

पण केंद्रच्युति अल्प असतेवेळीं ES = CK, आणि $u = nt$. म्हणून केंद्रच्युति अल्प असेल तर CS = CH असें म्हणण्यास हरकत नाहीं. आणि CS = CH असेल तर H हा उच्चनाभि होतो.

OC, PH या समांतर रेषा आहेत. आणि AB रेघ त्यांस छेदिते. म्हणून ACO कोन AHP कोनाएवढा आहे. ACO कोन मध्यम केंद्र आहे म्हणून AHP हा कोनही मध्यमकेंद्रसमान आहे.

म्हणून कक्षाकेंद्रच्युति लहान असेल तर इत्यादि.

## भूमध्यगणित.

आम्हीं इष्टक्षणीं सूर्यमध्यांत बसून बुधादि ग्रहांकडे पाहिलें तर ते रेवती नक्षत्रापासून किती अंशावर दिसतील आणि प्रत्येक ग्रहाचें सूर्यापासून सरळ रेषात्मक अंतर पृथ्वीच्या मध्यमांतराच्या मानानें मोजलें तर, तें किती भरेल ही माहिती रविमध्यगणितावरून कळते. पण आम्हीं इष्टवेळीं भूमध्यांत बसून ग्रहां-

कडे पाहिलें तर बुधादि ग्रह रेवती नक्षत्रापासून किती अंशावर दिसतील व भूमध्यापासून प्रत्येक ग्रहापर्यंत सरळरेषारूप अंतर पूर्वोक्त मानदंडानें मोजलें तर तें किती भरेल ही माहिती काढण्याच्या गणितास भूमध्यगणित म्हणतात असें पूर्वी सांगितलेंच आहे.

रविमध्यगणितांत द्रष्टा स्थिर असून दृश्यपदार्थाच्या स्थानांतरामुळें जो दिग्भेद व अंतरभेद उत्पन्न होतो तो काढण्याचा हेतु असतो. भूमध्यगणितांत दृश्यपदार्थ क्षणभर स्थिर कल्पून द्रष्ट्याच्या स्थानांतरामुळें दृश्यपदार्थाच्या दिशेमध्यें व सरळ अंतरामध्यें जो भेद उत्पन्न होतो तो काढण्याचा हेतु असतो. एकच पदार्थ निरनिराळ्या ठिकाणाहून पाहिला तर त्याच्या दिशेंत व अंतरांत भेद पडतो हा चमत्कार आगगाडीनें प्रवास करणाऱ्यांस नेहमीं दृष्टीस पडतो. जी टेकडी पूर्वी पूर्वेस दिसते ती कांहीं वेळानें पश्चिमेकडे दिसूं लागते.

अगदीं बसल्या ठिकाणीं हा चमत्कार पाहणें असेल तर पुढें सांगितल्याप्रमाणें कृति करून पाहावी. वाचकांनीं आपल्या नाकासमोर एक वीत अंतरावर आपली प्रदर्शिनी अंगुली उभी धरून पाळीपाळीनें एकेक डोळा मिटून तिजकडे पाहावें. म्हणजे समोरच्या भिंतीवर अंगुलीचें टोंक आडव्या दिशेंत हेलकावत आहे असा भास होईल. पदार्थानें स्वतः हेलकावणें आणि हेलकावत आहे असा भास होणें या दोन चमत्कारांत महदंतर आहे. सूर्यमध्यगणितांत आणि भूमध्यगणितांत जो भेद आहे तो हाच.

अंगुली जसजशी ललाटाकडे न्यावी तसतसें तिचें आंदोलन मोठें होत जातें. पण उलट ललाटापासून ती जसजशी मागें न्यावी तसतसें तिचें आंदोलन कमी कमी होत जातें. या धर्मामुळें दृश्य आंदोलन पदार्थांचीं अंतरें ठरविण्याचें एक मुख्य साधन झालें आहे. आपण पृथ्वीच्या पाठीवर बसून तिच्या मध्याभोंवतीं फिरत फिरत सूर्याभोंवतींही फिरत आहों. पहिल्या गतीमुळें आमचें दैनंदिन सरळ स्थानांतर भूव्यासाएवढें होत असतें. आणि दुसऱ्या गतीमुळें आमचें वार्षिक स्थानांतर भूकक्ष व्यासाइतकें म्हणजे सुमारें १८ कोटी मैल होतें. पहिल्या आंदोलनास लंबन म्हणतात आणि दुसऱ्यास शीघ्रफल (Annual Parallax) म्हणतात. बसल्या ठिकाणीं ग्रहांच्या शीघ्रफलाची प्रतीति पहातां येते. समजा कीं, आमच्या डोळ्यांतील बाहुल्यांमध्ये दोन इंच अंतर आहे. तर आमच्या डोळ्यापासून तीन इंच

(१) इतर नक्षत्रांप्रमाणें सूर्यही आपली ग्रहमाला बरोबर घेऊन मंदगतीनें आकाशांत गमन करीत आहे. पण त्याची दिशा अद्यापि पक्की ठरलेली नाहीं. न्युकंबच्या मताप्रमाणें या स्थानाचे (Apex) विषुवांश २७७५ आणि क्रांति + ३५ अंश आहेत.

अंतरावर एक चवली धरून आपला डावा डोळा सूर्य आणि उजवा डोळा पृथ्वी समजून क्रमानें एकेक डोळ्याची उघड झाक केली तर ती चवली सुमारे ४० अंश म्हणजे मंगळाच्या शीघ्रफलाइतकी हेलकावेल. कारण पृथ्वी व मंगळ यांचे मंदकर्ण १ : १·५ या प्रमाणांत आहेत. याचप्रमाणें ती चवली ललाटापासून १० व १९ इंच अंतरावर धरून प्रयोग केला तर गुरु आणि शनि यांच्या शीघ्रफलाची प्रतीति येईल.

सूर्य, पृथ्वी आणि एक ग्रह हे रबरासारख्या प्रसरणाकुंचनशील धाग्यानें बांधले गेले आहेत अशी कल्पना केली तर एक चल त्रिकोण उत्पन्न होतो. याच्या सहा अवयवांपैकीं तीन अवयव म्हणजे दोन बाजू आणि त्यांच्यामधील कोन रविमध्य गणितावरून समजतात. कारण सूर्यापासून पृथ्वीपर्यंत अंतर म्हणजे रविमंदकर्ण ही एक बाजू, आणि ग्रहमंदकर्ण ही दुसरी बाजू. या दोन भुजांमधील कोन ( १८०°–शीघ्रकेंद्र ) याच्या इतका असतो. यावरून बाकीचे तीन अवयव म्हणजे एक बाजू ( शीघ्रकर्ण ) आणि दोन कोन ( भूकोन आणि ग्रहकोन ) काढणें हा भूमध्यगणिताचा विषय आहे. या दोन कोनांपैकीं जो कोन लहान असतो त्याला शीघ्रफल म्हणतात.

वरील विवेचनावरून दिसून येईल कीं, भूमध्यगणित हें त्रिकोणमितीचें एक कृत्य आहे. ज्यांस त्रिकोणमितीची माहिती आहे अथवा ज्यांस दुर्बीण मोजणी करितां येते त्यांस या गणिताचें कांहींच महत्व वाटणार नाहीं. पण असे वाचक थोडे म्हणून त्रिकोणमितीच्या रीतीनें मागें पान १७।१८ येथें दोन उदाहरणें करून दाखविलीं आहेत. आकृति काढून त्यांचें स्पष्टीकरण केल्यास वाचकांस विशेष उपयोग होईल असें वाटल्यावरून तसें येथें करीत आहों.

( आकृति ७ वी. ) यांत S हा सूर्य, V हा शुक्र आणि E ही पृथ्वी आहे. SR आणि Er या अनुक्रमें सूर्य आणि पृथ्वीवरून रेवतीताऱ्याकडे जाणाऱ्या रेषा आहेत. रेवती तारा अत्यंत दूर आहे म्हणून या रेषा परस्परांस समांतर आहेत. ABV कंस = ९८° – २५८° = २००°=शीघ्रकेंद्र. याचा भुज २०° याच्या भुजज्येनें शुक्रमंदकर्णास ·७१८४ गुणून गुणाकार ·२४५० हा VH लंब झाला. आणि कोटिज्येनें गुणून गुणाकार ·६७५३ हा SH अवलंब झाला. कोटिज्या ऋण आहे म्हणून हा अवलंबही ऋण झाला. म्हणून SE = ·९८३२ या पृथ्वीच्या मंदकर्णांतून हा अवलंब वजा करून बाकी HE = ·३०७९ हा स्फुटावलंब झाला. VHE हा काटकोन आहे म्हणून $\sqrt{(VH^2+HE^2)}$ = ·३९३५ हा शुक्राचा शीघ्रकर्ण झाला. शीघ्रकर्ण म्हणजे पृथ्वी आणि ग्रह यांच्या मधील सरळ रेषाकार अंतर.

लंबास ·२४५० शीघ्रकर्णानें ·३९३५ भागून भागाकार ·६२२७ हा VEH या कोनाची भुजज्या झाली. इचा कंस ३८° हें VEH कोनाचें माप झालें. यालाच शीघ्रफल म्हणतात. E वरून पहाणाऱ्यांस V शुक्र सूर्याच्या मागें दिसतो म्हणून सूर्यातून हा कोन वजा करून २५८° – ३८° = २२०° हा भूमध्यदृश्य शुक्राचा भोग सिद्ध झाला म्हणजे सूर्यामधून पहाणाऱ्यास रेवती ताऱ्यापासून RSV कोन = ९८ इतक्या अंशावर दिसणारा शुक्र, E या पृथ्वीवरून पहाणाऱ्यास RSV + VSC = $r$EV = २२०° अंतरावर दिसेल. या आकृतींत शुक्र व पृथ्वी यांच्या कक्षा एकाच पातळींत आहेत असें मानिलें आहे.

( आकृति ८. ) यांत बहिर्वर्ति मंगळाच्या भूमध्यगणिताचें प्रदर्शन केलें आहे. याचें विवरण वरच्या प्रमाणेंच आहे म्हणून तें तपशीलवार पुन्हां देण्याची जरूरी दिसत नाहीं. यांत S, M, आणि E अनुक्रमें सूर्य, मंगळ आणि पृथ्वी यांचीं स्थानें आहेत. EH हा लंब, SH हा अवलंब आणि MH हा स्फुटावलंब आहे. EMS कोन शीघ्रफल आहे. ME हा शीघ्रकर्ण आहे. सूर्य उणा मंगळ = २५८° – १६५° = ९३° हें विलोम शीघ्रकेंद्र ( म्हणजे चक्रशुद्ध शीघ्रकेंद्र )आहे.

बहिर्वर्तिग्रहाचा मंदकर्ण अंतर्वर्ति ग्रहाच्या मंदकर्णापेक्षां मोठा असतो. म्हणून त्रिकोणाच्या धर्माप्रमाणें अंतर्वर्ति ग्रहकोनापेक्षां बहिर्वर्तिग्रहकोन नेहमीं लहान असतो. या दोन कोनांपैकीं जो लहान तो शीघ्रफल; म्हणून बुध आणि शुक्र यांच्या गणितांत भूकोन शीघ्रफल होतो. आणि इतर ग्रहांच्या गणितांत इतर ग्रहाधिष्ठितकोण शीघ्रफल होतो.

( आकृति ७. ) E या पृथ्वीवरून शुक्रकक्षेला स्पर्श करून जाणारी एक EB रेघ काढली आणि सूर्यमध्यांतून जाणारी आणखी एक EA रेघ काढली तर या दोन रेघांमध्यें सुमारें ४६° चा कोन पडतो. याला शुक्राचें परमशीघ्रफल म्हणतात. शुक्रकक्षेची केंद्रच्युति अत्यल्प असल्यामुळें हें परमशीघ्रफल फारसें कमीजास्त होत नाहीं. पण बुधकक्षा बरीच दीर्घवर्तुळाकार आहे म्हणून स्पर्शस्थानीं लघ्वक्ष आणि बृहदक्ष असतील तर त्याचें परमशीघ्रफल अनुक्रमें १८° व २८° असतें. या बुध आणि शुक्र ग्रहांच्या परमशीघ्रफलांस त्यांचें सूर्यापासून परम इनांतर ( Greatest Elongation ) म्हणतात.

सरतेशेवटीं सर्वांच्या पहाण्यांत येणारा असा एक दृष्टांत देऊन हें भूमध्यगणितांचें व्याख्यान संपवितों:—( आकृति २१ पहा ).

अशी कल्पना करा कीं, एका चाबूकस्वारानें शर्यतीच्या राउंडच्या मध्यभागीं उभें राहून एक घोडा मंडळावर धरिला आहे आणि त्या स्वारापासून पाव मैलाच्या त्रिज्येवर आम्ही घोड्याच्या दिशेनें हळूं हळूं राउंडवर चालत आहों. अशा समयीं आपण घोड्याकडे पाहिलें तर तो घोडा स्वाराच्या पुढें मागें सुमारें ७८

अंश हेलकावत आहे, असें दिसेल. आणि आमच्या मंदगतीला अनुसरून तो चाबूकस्वार घोड्यासह क्षितिजावर आमच्या विरुद्ध दिशेकडे सरकत आहे असें आम्हांस दिसेल. इष्ट वेळीं आम्हांस घोडा क्षितिजावर कोठें दिसेल तें स्थान काढावयाचें तर प्रथम चाबूकस्वाराच्या दृश्य मंदगतीवरून त्याचें क्षितिजावरील स्थान ठरवावें आणि नंतर घोड्याच्या हेलकाव्याची दृश्य लांबी आणून ती चाबूकस्वाराच्या स्थानांत धनर्ण करावी, म्हणजे घोड्याचें स्थान निघेल. हा दृष्टांत अंतर्ग्रहगणितास पूर्णपणें लागू पडतो. यांत चाबूकस्वार, घोडा आणि आम्ही अनुक्रमें सूर्य, अंतर्ग्रह आणि पृथ्वी आहोंत, आणि क्षितिज क्रांतिवृत्त आहे असें समजावें.

आतां घोडा जर आम्हांकडे पाहील तर त्याला असें दिसेल कीं, आम्ही क्षितिजावर ( क्षितिजाला लागून ) मंदगतीनें चालत आहों, पण चाबूकस्वार मोठ्या झपाट्यानें क्षितिजाला लागून फिरत आहे. चाबूकस्वाराची गति झपाट्याची असल्यामुळें तो आमच्यामागून येऊन आम्हांस गांठून पुढें निघून जातो आणि याप्रमाणें सतत चाललें आहे. जेव्हां चाबूकस्वार, घोडा व आम्हीं एकाच रेषेंत असतो; तेव्हां आम्हीं आमच्या मंद गतीवरून ठरविल्या जागीं घोड्यास दिसतों. पण इतर वेळीं आम्हांस घोडा चाबूकस्वारामागें जितके अंश दिसतो तितकेच अंश घोड्यास आम्ही आमच्या गत्यनुसारी स्थानापासून मागें दिसतो. वक्री, स्तंभ, अतिचर वगैरे गतींच्या सर्व प्रकारांची उपपत्ति या साध्या दृष्टांताचा विचार केला तर सहज कळण्याजोगी आहे. या दुसऱ्या प्रकारांत चाबूकस्वार, घोडा आणि आम्ही अनुक्रमें सूर्य, पृथ्वी आणि बहिर्ग्रह आहोंत असें समजावें. यापासून बहिर्ग्रहगणिताची उपपत्ति चांगली लक्षांत येईल.

## दीर्घवर्तुलीय संस्कार.

सर्व ग्रह सूर्याभोंवतीं वर्तुलाकार कक्षांत फिरत असते तर १३ व्या आणि १४ व्या कोष्टकांत दिलेलीं इनांतरें व शीघ्रकर्ण दृक्प्रत्ययावह झाले असते. पण वस्तुतः प्रत्येक ग्रहकक्षा अधिक उणी दीर्घवर्तुलाकार असल्यामुळें कायम कोष्टकावरून काम भागत नाहीं. दीर्घवर्तुलाकारामुळें ग्रहांच्या मंदकर्णांत जो फेर पडतो त्यामुळें उत्पन्न होणारा संस्कार दिला पाहिजे. ही नूतनसंस्कारपद्धति आम्हींच शोधून काढिली असल्यामुळें तिची सविस्तर उपपत्ति देणें आवश्यक आहे. या हिकमतीमुळें गणितश्रम किती वांचतात त्याची कल्पना वाचकांस सहसा होणार नाहीं.

( आकृति १ वी ). यांत S, E, P हे अनुक्रमें सूर्य, पृथ्वी, आणि ग्रह आहेत. आणि

SP = ग्रहाचा मध्यममंदकर्ण ∠ PSE = षड्भाल्पशीघ्रकेंद्र
SE = पृथ्वीचा " ∠ SEP = मध्यम इनांतर
PE = मध्यमशीघ्रकर्ण ∠ SPE = मध्यम ग्रहकोण

शीघ्रकेंद्र १८० अंशांपेक्षां कमी असेल तर तें सहा राशिपेक्षां कमी असतेंच पण जर तें १८० अंशांपेक्षां जास्त असेल तर तें ३६० अंशांतून वजा करून षड्भाल्प करावें. भ = ३०°

गणितलाघवासाठीं प्रथम ग्रह आणि पृथ्वी आपापल्या मध्यममंदकर्णाएवढ्या त्रिज्येच्या वर्तुळांत सूर्याभोंवतीं फिरतात असें कल्पून मागें सांगितलेल्या त्रिकोणमितिपद्धतीनें शीघ्रकेंद्राच्या दर तीन अंशावर उत्पन्न होणारीं मध्यम इनांतरें आणि मध्यम शीघ्रकर्ण आणून ते कोष्टक १३ व १४ यांत दाखल केले आहेत.

पण वास्तविकपणें ग्रह व पृथ्वी यांच्या कक्षा दीर्घवर्तुलाकार आहेत म्हणून त्यांचे मंदकर्ण क्षणोक्षणीं बदलत जातात. म्हणून उदाहरणार्थ P आणि E अनुक्रमे इष्टवेळीं Q आणि G येथें असतील तर—

SQ = ग्रहाचा स्पष्ट मंदकर्ण. ∠ QSG = षड्भाल्पशीघ्रकेंद्र.
SG = पृथ्वीचा " ∠ SGQ = स्पष्ट इनांतर.
QG = स्पष्टशीघ्रकर्ण. ∠ SQG = स्पष्ट ग्रहकोण.

अशीं स्पष्ट मानें होतील. वरील मध्यममानें को. १३, १४ यावरून कळतातच तर या मध्यममानांस कोणता संस्कार केला तर स्पष्ट मानें येतील हा प्रश्न सोडविला पाहिजे.

GH, GC रेषा अनुक्रमें PE, SQ यांना समांतर काढ. आणि HD रेष GQ रेषेवर लंब कर. आतां GC रेष SP रेषेला समांतर आहे. म्हणून EGC, ESP हें सरूप त्रिकोण आहेत. म्हणून—

$$SE : SP :: GE : GC = \frac{SP \times GE}{SE} = \text{समांतर.}$$

$$= \frac{\text{ग्रहमध्यममंदकर्ण}}{\text{रविमध्यममंदकर्ण}} \times \text{पृथ्वीच्या स्पष्ट व मध्यममंदकर्णांचें अंतर.}$$

यांत रविमध्यममंदकर्ण = १ मानिला आणि पृथ्वीच्या स्पष्ट आणि मध्यममंदकर्णांच्या अंतरास मंदकर्णशेष हें नांव दिलें तर—

समांतर = ग्रहमध्यममंदकर्ण × सूर्यमंदकर्णशेष.

ग्रहांचा मध्यममंदकर्ण स्थिरसंख्या आहे. आणि सूर्याचें मंदकर्णशेष सूर्याच्या मंदकेंद्रावर अवलंबून असतें. म्हणून सूर्यमंदकेंद्र उपकरणावरून प्रत्येक ग्रहाचीं GC हीं समांतरें वर्तवून तीं ११ व्या कोष्टकांत नमूद केलीं आहेत.

आतां आम्हांस ∠ SGQ हें स्पष्ट इनांतर काढिलें पाहिजे. याचा मोठा भाग ∠ SGH = ∠ SEP = मध्यम इनांतर १३ व्या कोष्टकावरून कळतें. म्हणून बाकी राहिलेला ∠ HGD काढिला म्हणजे काम झालें.

$$HD = QH \sin HQD.$$

$$= QH \sin SPE \text{ सुमारें.}$$

पण $QH = QP + PH.$

$$= QP + GC.$$

$$= QS - SP + GC.$$

= ग्रहस्पष्टमंदकर्ण − ग्रहमध्यममंदकर्ण + समांतर.

= गुणक.

म्हणून $HD = \text{गुणक} \times \sin SPE.$

$$\sin HGD = \frac{HD}{HG} = \frac{\text{गुणक} \times \sin SPE}{PE}, \text{ सुमारें.}$$

$$\text{अंशात्मक } \angle HGD = \frac{\text{गुणक} \times \sin SPE \times ५७.३}{PE}.$$

यांत HGD या कोनाला **दीर्घवर्तुलीय** संस्कार आणि ५७.३ × sin SPE ÷ PE याला **दीर्घवर्तुलांश** हीं नांवें आम्हीं दिलीं आहेत. म्हणूनः—

∴ दीर्घवर्तुलीयसंस्कार = गुणक × दीर्घवर्तुलांश.

**टीपः**— आकृतींत QP, GE हीं मंदकर्णशेषें मनांत भरण्यासाठीं वाजवी-पेक्षां फारच मोठीं करून दाखविलीं आहेत. त्यामुळें आम्हीं जेथें जेथें 'सुमारें' हा शब्द वरील उपपत्तींत वापरला आहे त्या त्या किमती फार ढोबळ येतील असें वाचकांस वाटेल. पण वस्तुतः अशी गोष्ट नाहीं, असें पान २७ येथें आमच्या गणिताची फ्रेंच गणिताशीं केलेल्या तुलनेवरून खात्री होईल.

GH या कर्णरेषेबद्दल PE हा मध्यमशीघ्रकर्ण घेतला आहे. यामुळें क्वचित् प्रसंगीं थोडी तफावत येण्याचा संभव आहे. पण गणितश्रम वांचविण्यासाठीं असें करणें योग्य आहे. आमच्या ज्योतिर्गणितांत ही कर्णरेषा आणण्यासाठीं द्वितीय, तृतीय नांवाचे दोन गुणक जास्त दिले आहेत. त्यामुळें त्यांतील भूमध्यगणित जास्त सूक्ष्म झालें आहे. सदर गुणकामुळें गणित वाढून गणकांस कंटाळा येईल या भीतीनें ते गुणक येथें सोडून दिले आहेत.

सदर तुलनेमध्यें गुरुशनींच्या रविमध्यस्थानांत दोन चार कलामित अंतर

दिसून येतें त्याचें कारणही असेंच आहे. म्हणजे गणित वाढूं नये म्हणून आम्हीं त्यांचे लहान लहान संस्कार सोडून दिले आहेत.

हानसेननें मध्यमचंद्रास ५० संस्कार सांगितले आहेत. त्यांपैकीं एक कलेपेक्षां मोठे संस्कार मात्र आम्हीं घेतले आहेत. कलेच्या आंतील सुमारें ३०।३५ संस्कारांची उपेक्षा केल्यामुळें चंद्राच्या स्थानांत समयविशेषीं २।४ कला अंतर पडणें साहजिक आहे.

## भूमध्यशर.

( आकृति १० वी. ) येथें S,E,P अनुक्रमें सूर्य, पृथ्वी आणि ग्रह आहेत, APC हें ग्रहकक्षार्ध, AQC ही क्रांतिवृत्ताची पातळी, A हा उत्तर संपात, ASC ही संपातरेषा, PAQ हा विक्षेपकोन म्हणजे क्रांतिवृत्त व कक्षावृत्त यांच्या पातळ्यांमधील कोन.

ACQ ही क्रांतिवृत्ताची पातळी आकृति काढलेल्या कागदाच्या पातळींत आहे. APC हें कक्षार्ध कागदाच्या पातळीच्या वर आहे. PQ रेघ AQC पातळीवर Q स्थानीं लंब आहे. म्हणजे AQC हें एक दळण्याचें जातें कल्पिलें तर QP हा Q स्थानीं रोवलेला त्याचा खुंटा होईल.

अर्थात् SQP आणि EQP हे कोन काटकोन आहेत. आपणास PSQ हा रविमध्यशरकोन माहित आहे. यापासून PEQ हा भूमध्यशरकोन काढणें आहे.

SP हा ग्रहाचा मंदकर्ण त्याच्या कक्षापातळींत आहे. त्याचें S टोंक क्रांतिवृत्तपातळीला लागलें आहे. दुसरें P टोंक क्रांतिवृत्ताच्या पातळीपासून QP इतकें वर उचललेलें आहे. SP मंदकर्णाला PSQ या रविमध्यशराच्या कोटिज्येनें गुणिलें म्हणजे SP चें क्रांतिवृत्तावर परिणत केलेलें ( Projected ) SQ माप येतें. म्हणजे SQ ही SP ह्या ओझरत्या रेषेची क्रांतिवृत्तपातळीवर लंब दिशेनें पाडलेली प्रच्छाया ( Orthogonal Projection ) आहे.

भूमध्यगणितांत वास्तविक पाहिलें तर SP बद्दल SQ कर्ण घेतला पाहिजे. पण ग्रहशर बहुशः अल्प असतात. म्हणून त्यांची कोटिज्या १ मानून गणितलाघवासाठीं SQ = SP असें मानिलें आहे.

आतां,

$$PQ = SP.\sin PSQ = SP \times \angle PSQ \text{ . सुमारें.}$$

$$\frac{PQ}{QE} = \frac{SP \times \angle PSQ}{QE} = \tan PEQ = \angle PEQ \text{ सुमारें,}$$

म्हणून $\angle PSQ \times SP \div QE = \angle PEQ$.

म्हणजे रविमध्यशर × ग्रहमंदकर्ण ÷ शीघ्रकर्ण = भूमध्यशर.

गणितलाघवासाठीं वरील भूमध्यगणितपद्धतींत आम्हीं थोडी कसर जाऊ दिली आहे. पाश्चात्यांची अगदीं बिनकसरपद्धति पुढें दाखविल्याप्रमाणें आहे. प्रथम,

$$PQ = SP \sin PSQ;$$
$$SQ = SP \cos PSQ;$$

हीं मानें आणून नंतर SQ, SE आणि QSE कोन यावरून त्रिकोणमिति-पद्धतीनें QE बाजू आणि SEQ कोन काढतात. SEQ कोन इनांतर होतें. मग पुढील समीकरणावरून भूमध्यशर आणि भूग्रहांचें निजांतर ( True distance from the Earth ) हीं आणतात.

$\frac{PQ}{QE} = \tan PEQ =$ भूमध्यशरस्पर्शरेषा.

$PE = QE \sec PEQ =$ पृथ्वीपासून ग्रहापर्यंत सरळ अंतर.

---

## ग्रहांची भूमध्यदिनगति.

१५ व्या कोष्टकांतील दिनगतिफलें १३ व्या कोष्टकांतील इनांतरांवरून सिद्ध केलीं आहेत. हीं इनांतरें शीघ्रकेंद्राच्या तीन तीन अंशाच्या अंतरानें दिलीं आहेत. या इनांतरांचीं जीं अंतरें तींच शीघ्रकेंद्र तीन अंश वाढण्यास लागणऱ्या दिवसांचीं गतिफलें होतात. म्हणून हे दिवस आणून त्यांनीं इनांतरांच्या अंतरास भागिलें म्हणजे ग्रहांचीं दिनगतिफलें येतात. तीन अंश शीघ्रकेंद्र वाढण्यास किंवा कमी होण्यास बुधापासून अनुक्रमें ·९७, ४·८७, ६·५०, ३·३२, ३·१५, ३·०९, ३·०६ दिवस लागतात. उदा०– गुरूचीं शीघ्रकेंद्रें १८०° व १७७° असतांना तेथील इनांतरांचें अंतर – ३°·७१ =–२२२′·६ असतें, यांस ३·३२ नीं भागून आलें गुरूचें दिनगतिफल – ६९′·० या उपपत्तीचें बीजपद्धतीनें स्पष्टीकरण—

मंदस्पष्टरवि + इनांतर = भूमध्यग्रहस्थान. ( पान १३ )

समजा $S + E = P$ हें आजचें स्थान.

$S' + E' = P'$ हें उद्याचें स्थान.

तर $(S' - S) + (E' - E) = (P' - P) =$ दिनगति.

यांत $(S' - S) =$ ५९′·१ मध्यममानानें.

आणि $(E' - E) =$ दिनैकांतरित इनांतरांचें अंतर = गतिफल.

म्हणून ५९′·१ + गतिफल = भूमध्यग्रहदिनगति. ( पान १४ )

टीपः–दीर्घवर्तुलीय संस्कार अल्प म्हणून उपेक्षणीय आहे. बहिर्ग्रहांचीं शीघ्रकेंद्रें रोजच्यारोज कमी होत जातात. पण अंतर्ग्रहांचीं वाढतात.

बुधदिनगति विशेषः--बुधाचें मंदफल मोठें असल्यामुळें त्याच्या रविमध्यदिनगतींत पडणारा फेरफारही मोठा असतो. यामुळें शीघ्रकेंद्रांतही मोठा फेर पडतो. याचा परिणाम १५ व्या उपकोष्टकांतील गुणकानें दाखविला आहे. हा गुणक उत्पन्न करण्याचें सूत्र शके १८३३ सालच्या केतकीपंचांगांत दिलें आहे. तें--

$$\text{गतिफलगुणक} = 1 - \frac{\text{४ मंदकर्णशेष.}}{\text{३ मंदस्पष्टकर्ण.}}$$

बुधमंदकर्णाच्या रोजच्या फेरफारामुळें दिनगतीवर होणारा परिणाम वर्तुलांश गुणकानें दाखविला जातो. ज्योतिर्गणित पान १५४ यांत दिलेलीं मंदकर्णशेषाचीं जीं अंतरें त्यांसच वर्तुलांशगुणक हें नांव येथें दिलें आहे.

दिनगतिफलाची भूमितीय उपपत्तिः—

( आकृति ११. ) असें समजूं कीं, E, V, आणि T हीं विवक्षित क्षणीं पृथ्वी ग्रह आणि एक नक्षत्र यांचीं स्थानें असून तीं एकाच सरळ रेषेंत आहेत. आणि $n$, $m$, आणि शून्य या त्यांच्या अनुक्रमें रविमध्यदिनगति आहेत.

आतां $n$ ही गति तिनही गतींतून वजा केली तर त्यांच्या सापेक्ष गतींत ( Relative motions ) व्यत्यास होणार नाहीं. म्हणून तसें केल्यास शून्य, $m-n$ आणि $-n$ या त्यांच्या अनुक्रमें सापेक्षगति होतील. म्हणजे E पृथ्वी स्थिर होईल. V ग्रहाची गति ( $m-n$ ) = VP होईल. आणि T नक्षत्राला $-n$ गति उत्पन्न होईल म्हणजे E येथून पाहाणाऱ्यास T नक्षत्र TEU कोनाइतकें V पासून U कडे मागें गेल्यासारखें दिसेल. सारांश आज EVT या रेषेंत असणारा V ग्रह आणि T नक्षत्र यांच्यामध्यें E या भूमध्यांतून पहाणाऱ्यास उद्यां PEU या कोनायेवढें अंतर दिसेल. या PEU कोनाचा VEU भाग पृथ्वीच्या मध्यमगतिसमान म्हणजे $-n = -५९'.१$ आहे म्हणून तो माहित आहे. दुसरा भाग PEV हा कोन काढावयाचा आहे.

PQ रेघ EQ रेषेवर लंब कर आणि PE, PS आणि VS या रेघा काढ, PVK ही ग्रह कक्षा आहे आणि तिच्या मध्यबिंदूंत S हा सूर्य आहे, आतां,

$$VP = VS \times \angle VSP.$$

$\angle SVP$ काटकोन म्हणण्यास हरकत नाहीं. VP अल्प आहे म्हणून,

$$\therefore \quad PQ = VP \times \cos EVS.$$

$$= VS \cdot \angle VSP \cdot \cos EVS.$$

$$\frac{PQ}{EP} = \frac{VS \cdot \angle VSP \cdot \cos EVS}{EP} = \sin PEQ.$$

$$\therefore \quad \angle PEV = \frac{VS \cdot \angle VSP \cdot \cos EVS}{EV}$$ स्वल्पांतरानें.

∴ दिनगतिफल = ग्रहमंदकर्ण × रविग्रहदिनगत्यंतर.
× ग्रहस्थानीय कोणकोटिज्या ÷ शीघ्रकर्ण.

**उदाहरणः**—पूर्वोक्त दिवशीं गुरूचें भूमध्यगतिफल किती ?

न्यास २१३ पहा. गुरूचा मंदकर्ण=५·१६२; गत्यंतर −५४′; (शीघ्रकेंद्र–इनांतर) =( १७५°·३७–१७४°·२७ ) = १°·१७. याची कोटिज्या= १ शीघ्रकर्ण, ४·२०४ अशीं मानें आहेत. म्हणून,

५·१६२ × ( – ५४′·० ) × १ ÷ ४·२०४ = – ६६′·३ हें गतिफल झालें.

**कै० केरोपंत छत्रे** यांच्या ग्रहसाधनांत दिलेल्या रीतीची उपपति. ( आकृति १२ वी पहा ). या रीतींत पृथ्वी व ग्रह हे दोनही चल आहेत.

यांत S, V, E हे अनुक्रमें सूर्य, ग्रह आणि पृथ्वी आहेत. VP आणि EH या ग्रह आणि पृथ्वी याच्या अनुक्रमें रविमध्यदिनगति आहेत. HR रेघ EQ रेघेशीं समांतर आहे. HG, PR हे QE रेघेवर लंब आहेत. T,U हीं नक्षत्रें आहेत.

समजा कीं कोणे एके दिवशीं E, V आणि T म्हणजे पृथ्वी ग्रह आणि एक नक्षत्र, EVT या सरळरेषेंत आहेत. तर दुसऱ्या दिवशीं V ग्रह P येथें गेला असेल. आणि E पृथ्वी H येथें गेली असेल. T हें नक्षत्र जें पूर्व दिवशीं EV दिशेंत दिसत होतें तें त्याच रेषेला समांतररेषेंत ह्मणजे HRU रेषेंत भूस्थ द्रष्ट्याला दिसेल. कारण नक्षत्रें अत्यंत दूर आहेत. ह्मणून त्यांच्याकडे जाणाऱ्या रेषा नेहमीं समांतर असतात. भूकक्षेच्या दोन व्यासाग्रांवरून कोणत्याही नक्षत्राकडे पाहिलें तर त्याच्या स्थानांत १ विकलेचा देखील दिग्भेद ह्मणजे लंबन दिसून येत नाहीं. १८ कोटि मैल लांब रेषा नक्षत्रावरून पाहिली तर ती केवळ एक बिंदुरूप दिसेल इतकीं तीं आम्हांपासून दूर आहेत.

अर्थात् पूर्व दिवशीं भूस्थ द्रष्ट्यास V ग्रह T नक्षत्रावर दिसत होता. तो पृथ्वी आणि ग्रह यांच्या गतीमुळें दुसऱ्या दिवशीं त्याच नक्षत्रापासुन RHP कोनाइतका पुढें दिसेल. ह्मणून आपणांस RHP कोनाचें मान काढिलें पाहिजे.

$\angle SVP$ काटकोन आहे म्हणून $\angle SVE + \angle PVQ = 90^\circ$.

आणि $\angle SEH$ काटकोन आहे म्हणून $\angle SEG + \angle GEH = 90^\circ$.

$PV = VS \cdot \angle VSP$.

$PQ = PV \cdot \cos \angle SVE$.

$$PQ = VS \cdot \angle VSP \cdot \cos SVE.$$

पुनः $EH = ES \cdot \angle ESH.$

$$HG = EH \cdot \cos SEV.$$
$$= ES. \angle ESH. \cos SEV.$$

पुनः $PR = PQ + HG$, कारण $QR = HG$.

$$\frac{PR}{HP} = \frac{VS \cdot \angle VSP \cdot \cos SVE}{HP} + \frac{ES \cdot \angle ESH \cdot \cos SEV}{HP}.$$

पण $\frac{PR}{HP} = \sin RHP = \angle RHP$. आणि $PH = VE$ सुमारें.

$$\angle RHP = \frac{VS. \angle VSP. \cos SVE}{VE} + \frac{ES. ESH. \cos SEV}{VE}.$$

म्हणून भूमध्यदृश्य दिनगतिः—

$$= \frac{\text{ग्रहमंदकर्ण} \times \text{ग्रहदिनगति} \times \text{ग्रहस्थानीयकोणकोटिज्या}}{\text{शीघ्रकर्ण}}$$

$$+ \frac{\text{भूमंदकर्ण} \times \text{भूदिनगति} \times \text{भूस्थानीयकोणकोटिज्या}}{\text{शीघ्रकर्ण}}.$$

रविमध्यग्रहांतून भूमध्यग्रह वजा केला म्हणजे ग्रहस्थानीय कोण येतो. आणि इनांतर हा भूस्थानीय कोण असतो. वरील समीकरणांत मध्यममानाचा उपयोग केला आहे. म्हणून इच्छिलेल्या ग्रहांचीं मध्यममानें वरील समीकरणांत मांडलीं म्हणजे त्यांच्या दिनगतींचें समीकरण उत्पन्न होतें. उदाहरणार्थ शुक्र घेऊं. शुक्राचा मंदकर्ण × दिनगति = ९६′ × ·७२३ = ६९′·४ आणि भूमंदकर्ण × भूदिनगति = १ × ५९′·१ = ५९′·१ म्हणून—

$$\text{शुक्रगति} = \frac{६९\cdot४ \ \text{शुक्रकोणकोटिज्या} + ५९\cdot१ \ \text{भूकोणकोटिज्या}}{\text{शुक्रशीघ्रकर्ण}}.$$

इष्टग्रहगति शून्य कोठें होते तें स्थान काढावयाचें असेल तर गतिफल कोष्टकांत त्याचें गतिफल केवढ्या शीघ्रकेंद्रावर किंवा इनांतरावर–५९′·१ होतें तें शोधून काढावें. म्हणजे तेंच शून्यगतिस्थान म्हणजे ग्रहस्तंभस्थान (Stationary Point) होईल. पान ६२ पहा.

## ग्रहांचीं बिंबें.

पदार्थ जवळून मोठा दिसतो आणि दुरून लहान दिसतो. म्हणजे बिंबाची ऱ्हासवृद्धि अंतराच्या व्यस्त प्रमाणांत घडते. म्हणून गणिताच्या सोईसाठीं कांहीं

एका नियमित अंतरावरून ग्रहांकडे पाहिलें तर प्रत्येक ग्रहाचें बिंब केवढें दिसेल तें अनेक वेधांवरून ज्योतिर्वेत्त्यांनीं सूक्ष्मपणें ठरविलें आहे. या कामीं त्यांनीं सूर्य आणि पृथ्वी यांचें मध्यमांतर घेतलें आहे. म्हणजे प्रत्येक ग्रह भूकक्षेंत आणून उभा केला तर त्याचा व्यास सूर्यावरून केवढा दिसेल त्याचें मान बुधापासून अनुक्रमें ६″·६, १७″·५, ९″·३, १९६″·०, १६४″·८, ७५″·०, ६७″·३. आहे. म्हणून या अंकांस एकानें गुणून त्या त्या ग्रहाच्या शीघ्रकर्णानें भागिलें म्हणजे पृथ्वीवरून दिसणारीं त्या त्या ग्रहांचीं बिंबें येतात.

---

## ग्रहांच्या कला.

ग्रहगोलाचा जो अर्धभाग सूर्यासमोर असतो तेवढाच प्रकाशित असतो. दुसऱ्या अर्ध्या भागावर अंधार असतो. सूर्यप्रकाशांत एकादा वाटोळा चेंडू धरून पहावा म्हणजे खात्री होईल. पण पृथ्वीवरून दिसणारा त्याचा अर्धभाग सूर्यावरून दिसणाऱ्या अर्धभागाहून निराळा असतो. म्हणून सूर्य आणि पृथ्वी यांस जो गोलांश साधारण असतो तेवढाच आम्हांस प्रकाशित दिसतो.

( आकृति १३ वी ) येथें S, E, V हे अनुक्रमें सूर्य, पृथ्वी आणि ग्रह यांचे मध्यबिंदु आहेत. BD रेघ SV रेघेवर V स्थानीं लंब आहे आणि AVC रेघ VE रेघेवर लंब आहे. V ग्रहाचा BAD हा अर्धभाग सूर्यासमोर असल्या-मुळें तो प्रकाशित आहे. बाकीचा BCD अर्धभाग अंधःकारमय आहे. ADC हा अर्धभाग पृथ्वीला समोर आहे म्हणून तिला येवढाच भाग दिसतो. बाकीचा ABC भाग दिसत नाहीं. पृथ्वीला दिसणाऱ्या ADC भागापैकीं AD कंस मात्र तेजःपुंज दिसतो. म्हणून आम्हांस AD कंस किंवा AVD या कोनाचें माप काढिलें पाहिजे.

$\angle BVS = \angle AVE$ प्रत्येक कोन काटकोन आहे म्हणून.

$\therefore\ \angle BVA = \angle SVE$. युक्लिड प्र. प्र. २

पुनः $\angle AVD = 180^\circ - \angle BVA$.

$= 180^\circ - \angle SVE$.

$= 180$ − ग्रहस्थानीय कोण.

$= 180$ − ( शीघ्रकेंद्र − इनांतर ).

सित $= 180$ + इनांतर − शीघ्रकेंद्र.

उदाहरणः—शुक्राचें शीघ्रकेंद्र २०० अंश आहे तर या समयीं त्याचें **सित** काय असेल ? शीघ्रकेंद्र २००° असते वेळीं त्याचें इनांतर − ३७·५ असतें. ( कोष्टक १३ ). म्हणून वरील समीकरणांत या किंमती मांडून समीकरण सोड-

विलें तर सित = १८०° – ३७.५ – २००° =–५७.५ = ३०२.५. याला १२ नीं भागिलें तर २५ वी तिथि येते म्हणजे शुक्र कृष्णदशमीच्या चंद्रासारखा दिसेल.

---

## शुक्राची सुषमा.*

( *Greatest Brilliancy.* )

१३ व्या आकृतीच्या बाजूस शुक्रबिंबाची आकृति काढून दाखविली आहे. तसेंच सिद्धतेसाठीं SV रेघ पुढें वाढवून तिच्यावर EM रेघ लंब केली आहे. SE = १ = रविमंदकर्ण, SV = $a$ = शुक्रमंदकर्ण, आणि EV = $x$ = शुक्रशीघ्रकर्ण असें समजा.

शुक्रबिंबाच्या आकृतींत GAHD ही कोर प्रकाशित आहे. हिची आंतील बाजू GDH दीर्घवर्तुलाचा परिवार्ध आहे. आणि दीर्घवर्तुलाच्या धर्माप्रमाणें हिचें क्षेत्रफल AD रेषेप्रमाणें बदलतें. AD रेघ म्हणजे AVD कोनाची उत्क्रमज्या ( Versed sine) म्हणजे (१–कोटिज्या) आहे. प्रकाशाचें तेज अंतराच्या वर्गाच्या व्युत्क्रम प्रमाणांत असतें. म्हणजे दिव्यापासून १ हात अंतरावर जितका प्रकाश असतो त्याच्या चतुर्थांशाइतका उजेड २ हात अंतरावर असतो. ३ हात अंतरावर केवळ नवमांश उजेड पडतो. याप्रमाणें प्रकाश झपाट्यानें कमी कमी होत जातो.

म्हणून चकाकीचें मान पुढील अपूर्णांकावर अवलंबून असतें.

$$\text{चकाकी} = \frac{1-\cos AVD}{EV^2} = \frac{1-\cos SVE}{EV^2}$$

$$\text{आतां } SE^2 = SV^2 + VE^2 + 2\, SV.\, VE.\cos SVE$$

$$1 = a^2 + x^2 + 2\,ax\cos SVE$$

$$\therefore \cos SVE = -\frac{a^2+x^2-1}{2\,ax}$$

$$\text{आणि } \frac{1-\cos SVE}{EV^2} = \frac{1}{x^2}\left(1+\frac{a^2+x^2-1}{2\,ax}\right)$$

$$= \frac{2\,ax + a^2 + x^2 - 1}{2\,ax^3}$$

$$\text{चकाकी} = \frac{(a+x)^2-1}{2\,ax^3}$$

---

* सुषमा परमा शोभा भाच्छविद्युतिदीप्तयः ।

— अमरकोश.

**टीपः**—ही चकाकी महत्तम होण्यास वरील अपूर्णांकाची किंमतही महत्तम (Maximum) झाली पाहिजे. येथें परमाणुगणिताची मदत घेतली पाहिजे.

परमाणुगणित म्हणजे क्रमवर्धिष्णु पिंडाच्या वृद्धीचा वेग काढण्याचें गणित. क्रमवर्धिष्णु पिंड महत्तम व्हावा तर त्याच्या वृद्धीचा वेग म्हणजे परमाणुवृद्धि शून्य झाली पाहिजे. मूल उपजल्यावर त्याचा पिंड आरंभीं बऱ्याच वेगानें वाढत असतो. पण पुढें हा वेग कमी होत होत शून्य झाला म्हणजे त्याची वाढ खुंटते आणि त्यावेळीं त्याचा देहपिंड परमावधीस पोंचला असतो. हाच नियम आकर्षणामुळें उत्पन्न होणाऱ्या समुद्राच्या भरती ओहोटी इत्यादि सर्व आकर्षण-चमत्कारांस लागू पडतो.

**क्रमवर्धिष्णु पिंड म्हणजे** A continuous function; वेग किंवा परमाणु-गुणक म्हणजे A differential coefficient; परमाणु म्हणजे A differential; मूलराशि अथवा स्वतंत्रविकारी म्हणजे An independent Variable-पिंड म्ह. An integral, पिंडीकरण म्ह. To integrate, परमाण्वीकरण म्ह. To differentiate, परिपाक म्ह. A function इत्यादि पारिभाषिक शब्द आम्हीं नवीन योजिले आहेत. शून्यलब्धि व मूलपरिणाति हे जुनें शब्द आमच्या मतें अन्वर्थक नाहींत.

म्हणून परमाणुगणितपद्धतीनें वरील चकाकीच्या पिंडाचा परमाणुवेग काढून तो शून्याबरोबर मांडून समीकरण सोडविलें म्हणजे $x$ ची जी किंमत निघेल तितका शुक्राचा शीघ्रकर्ण जेव्हां असतो तेव्हां शुक्राची चकाकी परमावधीची असते.

वरील समीकरणांत $x$ हा स्वतंत्र विकारी राशि आहे आणि $a$ स्थाणु आहे. छेदांतील $2a$ हेंही स्थाणु आहे.

जर $U = \dfrac{(a+x)^2 - 1}{x^3}$ = चकाकी; $\dfrac{du}{dx}$ = वेग;

तर $\dfrac{du}{dx} = 2x^3(a+x) - 3x^2\left\{(a+x)^2 - 1\right\} = 0$

$= 2ax + 2x^2 - 3a^2 - 6ax - 3x^2 + 3 = 0$

$= x^2 + 4ax + 3(a^2 - 1) = 0$

$\therefore x = \sqrt{a^2 + 3} - 2a$

म्हणजे ज्या दिवशीं शुक्रशीघ्रकर्णाची किंमत वर लिहिल्याइतकी होते, त्या दिवशीं शुक्र **परमदेदीप्यमान** दिसतो. आतां,

$a$ = शुक्रमंदकर्ण = ·७२३३ आहे.

ही किंमत वरील समीकरणांत ठेवून समीकरण सोडविलें तर $x = \cdot४३०४$ शीघ्रकर्ण निघतो. १४ व्या कोष्टकांत पाहिलें तर ·४३०४ येवढा शीघ्रकर्ण शीघ्र-केंद्राच्या १५७·७ अंशांवर असतो असें समजतें. म्हणून ज्या दिवशीं शुक्राचें शीघ्रकेंद्र १५८° असतें त्या दिवशीं आणि षड्भांतर झाल्यावर पुन्हां जेव्हां त्याचें शीघ्रकेंद्र ३६०° – १५८° = २०२° होतें त्या दिवशीं असें दोन वेळां शुक्र परमोज्ज्वल दिसतो. उपकोष्टक १६ वें पहा.

बुधाचा मंदकर्ण ·३८७१ आहे. हा वरील समीकरणांत $a$ च्या जागीं मांडून समीकरण सोडविलें तर बुधशीघ्रकर्ण १·००० निघतो. यावेळीं त्याचें शीघ्रकेंद्र १०१ अंश असतें. यावरून परमेनांतराच्या सुमारास बुध परमदीप्तिमान् दिसतो असें निघतें.

मंगळादि बहिर्ग्रहांची परमौजस्विता त्यांच्या षड्भांतरसमयीं (Time of Opposition) घडते. कारण या प्रसंगीं त्यांचें प्रकाशित बिंब पूर्ण असून पृथ्वीपासून त्यांचें अंतरही परमाल्प असतें.

---

**लंबन व क्षितिजलंबन**— एकाच काळीं भूमध्यांतून व भूपृष्ठावरून एखाद्या ग्रहाकडे पाहिलें तर त्याच्या स्थानांत जें अंतर दिसून येतें त्याला लंबन म्हणतात.

(आकृति १४ वी.) येथें ABC हें भूपृष्ठ आहे आणि E भूमध्य आहे. EA रेषा Z पर्यंत वाढवून A स्थानीं AT रेषा तिला लंब काढली आहे. म्हणून AT हें क्षितिज आणि Z हें खस्वस्तिक आहे. TB रेष ABC वर्तुळाला B बिंदूंत स्पर्श करिते म्हणून EBT कोन काटकोन आहे.

इष्टकाळीं गणितागत ग्रह Z येथें असेल तर A व E येथून पहाणाऱ्यांस तो Z येथेंच दिसेल. पण तोच ग्रह S येथें असेल तर E मध्यांतून पहाणाऱ्याला Z आणि S यांमध्यें ZES कोन दिसेल आणि A या भूपृष्ठावरून पहाणाऱ्यास ZAS कोन दिसेल. अर्थात् $\angle ZAS - \angle ZES = \angle ESA$ हा लंबनकोन झाला. Z येथें ग्रह असतां हा कोन ० असतो. आणि ग्रह जसजसा खमध्यापासून दूर जाईल तसतसा लंबनकोन वाढत जातो. T या क्षितिजाला ग्रह टेंकला असतां, म्हणजे ग्रह उगवतांना व मावळतांना ETA हा लंबनकोन महत्तम असतो. म्हणून यावेळच्या लंबनाला क्षितिजलंबन किंवा परमलंबन म्हणतात.

T वरून पाहिल्यास भूबिंब ATB कोनायेवढें दिसेल. ETA, ETB कोन समान आहेत म्हणून ETA हें परमलंबन T ग्रहावरून दिसणाऱ्या भूबिंबाच्या अर्धपट आहे. अर्थात् सूर्याचें क्षितिजलंबन म्हणजे सूर्यावरून दिसणारें भूबिंबार्ध. हें अर्वाचीन सूक्ष्म वेधाप्रमाणें $8''.8$ ठरलें आहे. हें एक

ज्योतिष मानदंडायेवढ्या अंतरावरून दिसणारें आहे. याला इष्टग्रहाच्या शीघ्रकर्णानें भागिलें म्हणजे इष्ट ग्रहावरून दिसणारें भूबिंबार्ध किंवा ग्रहाचें क्षितिजलंबन येतें.

सिद्धांतग्रंथांत AS यास दृक्सूत्र आणि ES यास गर्भसूत्र म्हणतात. म्हणून ' दृग्गर्भसूत्रयोरैक्यात्खमध्ये नास्ति लंबनम् ' हें सि. शिरोमणींतलि वाक्य सोपपत्तिक आहे असें वरील विवेचनावरून दिसून येतें.

## ग्रहांचे भूमध्यभोग आणि शर यांपासून त्यांचे विषुवांश आणि क्रांति आणणें.

हें काम गोलीय त्रिकोणमितीचें आहे. ज्याचापकर्माशिवाय हें सूक्ष्म होत नाहीं. ज्याचापकर्माचा तर सर्वांस तिटकारा; म्हणून थोड्या कसरीचा अंगीकार करून या कामासाठीं कोष्टकें २१ ते २३ रचिलीं आहेत.

( आकृति १५ वी;) यांत ABD हें गोलावरील विषुववृत्त उकलून सरळ रेषारूप करून दाखविलें आहे. AEBCD हें ही उकललेलें क्रांतिवृत्त आहे. A आणि B हे संपातबिंदु. या दोन वृत्तांच्या पातळ्यांमध्यें २३° २७′ येवढा कोन आहे. $r$ हें निरयन रेवतीस्थान आहे. म्हणून $Ar$ हें अयनांश.

P हा कक्षावृत्तावरील ग्रह आहे. P पासून क्रांतिवृत्त व विषुववृत्त यांजवर अनुक्रमें PQ आणि PS हे कंसाकार लंब टाकले आहेत. म्हणून AEQ आणि PQ हे त्या ग्रहाचे अनुक्रमें सायनभोग व शर झाले. त्यांचीं मानें भूमध्यगणितानें आणिल्यावर त्यांच्या साधनानें AS आणि PS म्हणजे अनुक्रमें त्यांचे विषुवांश आणि क्रांति यांचीं मानें आणलीं पाहिजेत.

ASO आणि PQO हे दोन काटकोन गोलीय त्रिकोण आहेत. यांपैकीं पहिल्या त्रिकोणाचे दोन कोन OAS व ASO हे स्थिर आहेत. पण AO बाजू चल आहे म्हणजे P ग्रहाच्या गत्यनुसार बदलणारी आहे. म्हणून O बिंदु A संपातापासून दर तीन तीन अंशांवर आहे असें कल्पून गोलीय त्रिकोणमितीनें त्याचे विषुवांश व क्रांति काढून कोष्टक २२ वें व २३ वें हीं तयार केलीं आहेत.

PQO हा गोलीय त्रिकोण ग्रहगणितांत बराच लहान असतो. PQ शर बहुशः ५° पेक्षां फारसा मोठा असत नाहीं. म्हणून POQ हा सरळरेषात्रिकोण मानिला तर एक कलेपेक्षां जास्त तफावत येत नाहीं. म्हणून गणित निर्वाहासाठीं तसें मानिलें आहे. PQO हा काटकोन आहे. OPQ कोनास अयनवलन म्हणतात. PQ शर त्या त्रिकोणाची एक बाजू आहे. म्हणून PQO या सरळरेषात्रिकोणांत एक बाजू आणि ३ कोन दिले आहेत. त्यांवरून त्याचे राहिलेले अवयव काढणें येवढाच प्रश्न आहे.

PQO त्रिकोणांत PO, OQ आणि QP या बाजू अनुक्रमें कर्ण, भुज आणि

कोटी आहेत. म्हणून PQ बाजूला OPQ कोनाच्या स्पर्शरेषेनें (म्हणजे येथें भुजगुणकानें) गुणिलें म्हणजे PO बाजू निघते आणि छेदनरेषेनें (कर्णगुणकानें) गुणिलें म्हणजे QO बाजू निघते.

मग AEQ या ग्रहाच्या सायनभोगांत QO कंस मिळवून येणाऱ्या AEO कंस उपकरणानें २२ व्या कोष्टकांतून AS हा विषुवभोग (विषुवांश) निघतो. आणि याच उपकरणानें २३ व्या कोष्टकांतून OS क्रांति आणून तिजमध्यें PO ही बाजू मिळविली म्हणजे PS ही क्रांति येते.

## चंद्रगणित.

ग्रहगणिताची जी उपपत्ति मागें सांगितली तीच पुष्कळ अंशीं चंद्रगणितासही लागू पडते. भेद इतकाच कीं, ग्रह सूर्याभोंवतीं फिरतात म्हणून प्रथम त्यांचीं रविमध्यस्थानें आणून नंतर त्यापासून त्यांचीं भूमध्यस्थानें आणावीं लागतात. पण चंद्र मूलतः पृथ्वीभोंवतींच फिरत असतो म्हणून त्याला मंदफल आणि आकर्षणसंस्कार देतांच त्याचें भूमध्यदृश्यस्थान निघतें. हीच गोष्ट सूर्यासही लागू आहे. पृथ्वी सूर्याभोंवतीं फिरते. म्हणून सूर्य तिच्यासमोर १८०° वर आम्हांस नेहमीं दिसत असतो. म्हणून पृथ्वीचा मंदफलसंस्कार पृथ्वीला न देतां तिच्या समोर असणाऱ्या सूर्यास दिला म्हणजे भूमध्यदृश्य सूर्याचा भोग येतो. पहिल्या कोष्टकांत जो सूर्याचा क्षेपक ३४९·०८७ आहे तो खरें पाहिलें असतां पृथ्वीच्या १६९·०८७ या क्षेपकांत १८०° मिळवून सिद्ध केला आहे.

चंद्राचे निरनिराळे आकर्षणाचे प्रकार कसे उत्पन्न होतात त्याची उपपत्ति परमाणगणित व पिंडगणित यांच्या साहाय्याशिवाय देतां येत नाहीं. आणि हा विषय परम गहन असल्यामुळें त्याचें दिग्दर्शन देखील येथें करणें शक्य नाहीं. या विषयावर चांद्री गत्युपपत्ति (The Lunar Theory) नांवाचा निराळा ग्रंथ लिहिण्याचा आमचा इरादा आहे पण त्याला ग्राहक मिळण्याची आशा कमी.

जेव्हां संस्कारांची संख्या मोठी असते तेव्हां गणित करितेवेळीं धनर्णत्वासंबंधीं चुका होण्याचा संभव जास्त असतो. या आपत्तीच्या निरासासाठीं संस्कार-कोष्टकें दुप्पट वाढवून सर्व संस्कार नेहमीं धन होतील अशी व्यवस्था केली आहे. संस्कार धन होण्यासाठीं पहिल्या पांच संस्कारांत पुढें लिहिलेले पांच स्थिरांक (Constants) अनुक्रमें मिळविले आहेत. ०°·२५; ०°·८०; १°·३०; ६°·५०; ०°·१५. यांपैकीं पहिले तीन संस्कार चौथ्या उपकरणास देण्याचे असतात. म्हणून यांची बेरीज २°·३५ चौथ्या निज उपकरणांतून २०७°·९१ वजा करून राहिलेली बाकी २०५°·५६ मात्र १७ व्या कोष्टकाच्या क्षेपकांत दाखल केली आहे. त्याचप्रमाणें हे पांचही संस्कार मध्यमचंद्रास देण्याचे असतात

म्हणून या सर्वांची बेरीज ९°·०० ही निजमध्यमचंद्रांतून ३५५°·२९७ वजा करून बाकी ३४६°·२९७ क्षेपकांत दाखविली आहे.

पुढील सहा संस्काराचे स्थिरांक अनुक्रमें ३′·०, ३′·५, २′·०, १′·५, १′·५, १′·५, आहेत. हे संस्कार देण्याचें काम गणितकाराच्या मर्जीवर ठेविलें आहे. म्हणून हे संस्कार धन होण्यासाठीं मिळविलेल्या १३ कला शेवटीं वजा कराव्या असें सांगितलें आहे.

**गतिफलें**–आजच्या व उद्यांच्या संस्कारांत जें अंतर तेंच त्या संस्काराचें गतिफल. याप्रमाणें विचार केला तर जितके संस्कार तितकीं गतिफलें असलीं पाहिजेत. पण लहान संस्कारांचीं अंतरें फारच लहान असतात म्हणून तीं सोडून देऊन फक्त तीन मोठ्या संस्कारांचीं गतिफलें आम्हीं जमेस धरिलीं आहेत. त्यांचे स्थिरांक अनुक्रमें १००′, १००′, आणि ५९०′·६ असे आहेत. गतिफलाचा संस्कार चंद्राच्या मध्यमगतिला करावयाचा असतो. हे श्रम वांचविण्यासाठीं गतिफलाच्या स्थिरांकाची बेरीज चंद्रमध्यमगतिसमान केली आहे.

**उदाहरणार्थ** ४ थें उपकरण जें चंद्रमदकेंद्र तें १२ अंश आहे असें मानून त्याचें गतिफल काढून दाखवितों. या उपकरणाची दिनगति १३°·१ आहे ( को. १७ वें पहा. )

| | |
|---|---|
| कोष्टक १८ उप १२°... मंदफल ७°·९० = | ४७४′·० |
| ,, उप (१२°+१३°·१) मंदफल ९·३३ = | ५५९·८ |
| अंतर . . . . . . . . . | ८५·८ |
| स्थिरांक . . . . . . . . . | ५९०·६ |
| गतिफल . . . . . . . . . | ६७६·४ |

**चंद्राचा मंदकर्ण**–चंद्रेतर ग्रहांस मंदफल संस्कार दिले म्हणजे ते रविमध्य होतात. म्हणून त्यांस भूमध्य करण्यासाठीं त्यांच्या मंदकर्णांची जरूरी लागते. पण चंद्र हा स्वतः भूमध्याभोंवतीं फिरणारा असल्यामुळें त्याच्या मंदफलावरूनच कार्य सिद्धि होते. त्याच्या मंदकर्णाची आवश्यकता रहात नाहीं. तथापि वाचकांच्या माहितीसाठीं लंबनानुसारीं त्यांचीं मानें खालीं दिलीं आहेत. तीं पृथ्वीची निरक्षत्रिज्या एक कल्पून दिलीं आहेत. ( Annuaire pour L'an 1911 ).

| लंबन. | मंदकर्ण. | लंबन. | मंदकर्ण. | लंबन. | मंदकर्ण. |
|---|---|---|---|---|---|
| ५२′ | ६६.११३ | ५५′ | ६२·५०७ | ५८′ | ५९·२७४ |
| ५३ | ६४·८६५ | ५६ | ६१·३९१ | ५९ | ५८·२७० |
| ५४ | ६३·६६५ | ५७ | ६०·३१४ | ६० | ५७·२९९ |
| ५५ | ६२·५०७ | ५८ | ५९·२७४ | ६१ | ५६·३६० |

**चंद्रबिंब**—बिंब, दिनगति, आणि परमलंबन हे तीनही राशि (Quantities) चंद्रमंदकर्णाचे परिपाक (Functions) आहेत. अर्थात् हे परस्परांचे परिपाकही असले पाहिजेत. म्हणून मंदकर्णाच्या साहाय्याशिवाय केवळ दिनगतीपासून चंद्राचें बिंब आणि परमलंबन यांच्या किंमती ठरविणें शक्य आहे. जसेंः—

**केप्लरच्या** दुसऱ्या नियमानुसारें चंद्राचा मंदकर्ण पृथ्वीमध्याभोंवतीं नित्य सारखीं क्षेत्रें चालतो. म्हणजे त्याचें नित्य चालून जाण्याचें क्षेत्र अविकारी असतें. या क्षेत्राचा आकार सेक्टरासारखा असला पाहिजे हें उघड आहे.

असें समजा कीं—

$a$ = सेक्टराचें द्विगुणक्षेत्र $\qquad d$ = चंद्रबिंब

$r$ = सेक्टराची एक बाजू $\qquad e$ = सेक्टराचा कंस

$v$ = शिरकोन = दिनगतिचापीयमान.

तर $e = rv$; आणि $a = er = vr^2$;

$$\therefore \quad v = \frac{a}{r^2}; \text{ आणि } \sqrt{v} = \sqrt{a} \times \frac{1}{r}$$

बिंब आणि अंतर यांचें व्यस्तप्रमाण असतें. म्हणून यांचा गुणाकार अविकारी असतो. तो $b$ आहे असें समज. तर,

$$b = rd \text{ ; म्हणून } r = \frac{b}{d}; \text{ आणि } \frac{1}{r} = \frac{d}{b};$$

ही किंमत वरील समीकरणांत मांडली तर

$$\sqrt{v} = \sqrt{a} \times \frac{d}{b}; \text{ म्हणून } d = \sqrt{v} \times \frac{b}{\sqrt{a}}$$

यावरून चंद्राचें बिंब हें दिनगतीच्या वर्गमूळाच्या कांहीं एका अविकारी पटीं-बरोबर असतें असें सिद्ध झालें. वरील समीकरणांत $d$ आणि $v$ यांचीं वेधसिद्ध मध्यम मानें मांडून समीकरण सोडविलें तर या अविकारी पटीची किंमत येईल.

$$\therefore 31'{\cdot}1 = \sqrt{790'{\cdot}6} \times \frac{b}{\sqrt{a}}$$

$$\therefore \frac{b}{\sqrt{a}} = \frac{31'{\cdot}1}{28'{\cdot}1} = \frac{10}{9}; \text{ म्हणून } d = \sqrt{v} \times \frac{10}{9}$$

याप्रमाणें आमच्या केतकीग्रंथांतील चंद्रबिंब आणण्याचें सूत्र ‘ **विधोः स्पष्ट भुक्तेः पदं स्वग्रहांशान्वितं चंद्रबिंबम्** ’ याची उपपत्ति झाली. अर्थात् ‘ **विधोर्भुक्तिर्वेदाग्नि ( ७५ ) भिरपहृतं बिंबमुदितम्** ’ ही केवळ दिनगतीच्या